# इस्लाममध्ये मानव-अधिकार

लेखक

**सय्यद अबुल आला मौदूदी**

अनुवाद

**मुबारक हुसेन मनियार**

# अनुक्रमणिका

"अल्लाहच्या नावाने, जो अत्यंत दयावंत व असीम कृपावंत आहे"

# इस्लाममध्ये मानव-अधिकार

'इस्लाममध्ये मानव-अधिकार' या विषयावर मला आपल्याला काही सांगायचे आहे, परंतु तत्पूर्वी हे आवश्यक आहे की मी दोन मुद्यांवर प्रकाश टाकावा, जेणेकरून चर्चेच्या दरम्यान त्यांच्या बाबतीत एखादी अडचण येऊ नये.

## पाश्चिमात्य देशांत मानव-अधिकारांची कल्पना

पाश्चात्य लोकांचा हा नियम राहिलेला आहे की ते प्रत्येक गोष्टीवर आपला शिक्कामोर्तब करुन प्रस्तुत करतात आणि हे सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात की ही देणगी व चांगुलपणा केवळ आमच्याकडूनच जगाला मिळाला आहे. नाहीतर जग या गोष्टीपासून अनभिज्ञ राहिले असते. आता हाच मानव-अधिकाराचा प्रश्न पाहा. असे ठामपणे सांगितले जाते की लोकांना याचे ज्ञान मॅग्नाकार्टामुळे प्राप्त झाले. खरे तर ती इस्लामनंतर सहाशे वर्षांची गोष्ट आहे. परंतु वास्तविकता अशी आहे की सतराव्या शतकातील कायदेतज्ञापूर्वी कोणाच्याही डोक्यात गोष्ट आली नव्हती की मॅग्नाकार्टामध्ये ट्रायल बाय ज्यूरी (Trial by Jury), हेबियस कॉर्पस (Habeas Corpus) आणि कर लागू करण्याच्या अधिकारात पार्लमेंटच्या नियंत्रणाचे अधिकारसुद्धा अंतर्भूत आहेत. जर मॅग्नाकार्टाचे लेखक या काळात असते तर त्यांना मोठे आश्चर्य वाटले असते की मॅग्नाकार्टात या गोष्टीदेखील सामील होत्या. जेथपावेतो माझ्या माहितीचा संबंध आहे, सतराव्या शतकापूर्वी पाश्चात्य लोकांत मानव-अधिकार आणि नागरी अधिकाराची कोणतीही कल्पना अस्तित्वात नव्हती. सतराव्या शतकानंतरसुद्धा एका दीर्घ मुदतीपर्यंत तत्त्वज्ञ आणि कायदेशीर दृष्टिकोन प्रस्तुत करणाऱ्या लोकांनी निश्चितपणे हा विचार मांडला. परंतु प्रत्यक्षपणे या कल्पनेचा पुरावा अठराव्या शतकाच्या अखेरीस अमेरिका व फ्रान्सच्या राज्यघटना व घोषणातच आढळतो. त्यानंतर विभिन्न देशांच्या राज्य घटनेत मौलिक अधिकारांचा उल्लेख अवश्य केला गेला आहे, परंतु अधिकांश अशीच स्थिती आढळली आहे की जे अधिकार कागदावर दिले गेले आहेत ते प्रत्यक्षपणे दिले गेले नाहीत. वर्तमान शतकाच्या मध्य काळात संयुक्त राष्ट्र संघाने, ज्याला आता असंयुक्त राष्ट्र संघ म्हणून संबोधणे अधिक संयुक्तिक ठरेल, मानव-अधिकारांची घोषणा (Universal Declaration of Human Rights) प्रसिध्द केली आणि वंश-संहाराच्या (Genocide) विरुध्दसुद्धा एक ठराव मंजूर केला आणि एक कायदा केला. परंतु आता सर्वांना माहीत आहे की संयुक्त राष्ट्र संघाचा कोणताही कायदा असा नाही की ज्याची

अंमलबजावणी करणे आवश्यक ठरते किंवा त्याच्या पाठीमागे एखादी शक्ती अशी आहे की ज्यामुळे तो लागू करण्यास भाग पडते. संयुक्त राष्ट्र संघाचे ते सर्व निर्णय आपल्या जागी असूनदेखील मानवी हक्कांची जागोजागी पायमल्ली होत आहे आणि संयुक्त राष्ट्र संघ त्यास आळा घालण्यात अपयशी ठरले आहे. जगात वंश-संहार अखंडपणे सुरुच आहे. परंतु संयुक्त राष्ट्र संघात असे सामर्थ्य नाही की त्याच्याविरुध्द त्याने कोणतीही कार्यवाही करावी. याउपर कोठेही कोणत्याही देशाविरुद्ध आजतागायत कोणतीही कार्यवाही केली गेली नाही.

## इस्लाममध्ये मानव-अधिकारांची मूळ स्थिती

दुसरी गोष्ट जी प्रारंभीच चांगल्या प्रकारे स्पष्ट करणे आवश्यक आहे ती अशी की, जेव्हा आम्ही इस्लाममध्ये मानवी अधिकाराविषयी बोलतो तेव्हा याचा अर्थ मुळात असा होतो की हे हक्क व अधिकार अल्लाहने प्रदान केले आहेत. हे जगातील एखाद्या सम्राट अथवा एखाद्या विधानसभेने दिलेले नाहीत. सम्राट व कायदे करणाऱ्या संस्थेने दिलेले हक्क ज्याप्रकारे दिले जातात, त्याचप्रमाणे हवे तेव्हा ते मागेसुद्धा घेतले जाऊ शकतात. हुकूमशाहांनी मान्य केलेल्या अधिकारांचीसुद्धा स्थिती अशीच आहे की जेव्हा हवे तेव्हा द्यावे आणि जेव्हा त्यांचे मन होईल तेव्हा कृती करावी. परंतु इस्लाममध्ये मानवाचे जे अधिकार आहेत ते अल्लाहने दिलेले आहेत. जगातील कोणत्याही विधानसभा आणि जगाच्या कोणत्याही शासनाला त्यात परिवर्तन करण्याचा अधिकार नाही. त्यांना मागे घेण्याचा अथवा रद्द करण्याचा अधिकार कोणासही नाही. हे अधिकार दाखविण्यासाठी नाहीत की जे कागदावर दिले जातात आणि अंमलबजावणीच्या वेळी हिरावून घेतले जातात. त्यांचा दर्जा तात्त्विक विचारांचासुद्धा नाही. ज्यांच्या पाठीमागे त्यांची अंमलबजावणी करणारी कोणतीही शक्ती (Sanction)नसते. संयुक्त राष्ट्र संघाचे चार्टर, घोषणा व ठरावांनासुद्धा त्यांच्याशी तुलना करण्यासाठी प्रस्तुत करणे शक्य नाही. त्याला कारण असे की त्यांची अंमलबजावणी करणे कोणासाठीही आवश्यक नाही. इस्लाम धर्माने दिलेले अधिकार इस्लामचा एक भाग होत. प्रत्येक मुस्लिम ते सत्य मानील आणि त्या प्रत्येक शासनास ते मान्य करणे व त्यांची अंमलबजावणी करणे भाग पडेल, जे इस्लामचा अवलंब करणारे आहेत आणि ज्यांच्या शासनकर्त्यानुसार ते मुस्लिम आहेत. ते असे करीत नसतील आणि या अधिकारांना जे अल्लाहने दिले आहेत, ते हिरावून घेत असतील अथवा त्यात परिवर्तन करीत असतील अथवा कृतीने त्यांची पायमल्ली करीत असतील तर त्यांच्यासाठी पवित्र कुरआनचा निर्णय असा आहे.

"जे लोक अल्लाहच्या अवतरित केलेल्या कायद्याला अनुसरून न्यायनिवाडा करीत नसतील तेच द्रोही होत." (दिव्य कुरआन, ५ : ४४)

यानंतर दुसऱ्या जागी सांगितले,

"तेच अत्याचारी होत." (दिव्य कुरआन, ५ :४५)

आणि तिसऱ्या आयतमध्ये म्हटले आहे,

"तेच फासिक (अवज्ञा करणारे) होत." (दिव्य कुरआन, ५ :४७)

अन्य शब्दांत या आयतींचा अर्थ असा आहे की जर ते स्वत: आपले विचार आणि आपल्या निर्णयांना सत्याधिष्ठित समजत असतील आणि अल्लाहने दिलेल्या आज्ञांना खोटे ठरवीत असतील, तर ते द्रोही आहेत आणि जर ते अल्लाहच्या आज्ञा सत्य मानीत असतील. परंतु अल्लाहने दिलेल्या गोष्टीला मुद्दाम रद्द करीत असतील व आपले निर्णय त्याविरुद्ध लागू करीत असतील तर ते पापी व जुलूम करणारे आहेत. पापी त्याला म्हणतात जो आज्ञाधारकतेची मर्यादा ओलांडून बाहेर जातो आणि जालीम तो आहे जो सत्याविरुद्ध कृती करतो. म्हणून यांची स्थिती मोकळी नाही, ते असे की एक तर ते अनेकेश्वरवादात अडकलेले आहेत अथवा ते दुराचार व अत्याचारात गुंतलेले आहेत. कोणत्याही परिस्थितीत जे अधिकार अल्लाहने मानवाला दिलेले आहेत, ते सदैव राहणार आहेत, अटळ आहेत, त्यात कोणत्याही प्रकारचे परिवर्तन अथवा कमी-जास्त करण्यास वाव नाही.

या दोन्ही गोष्टी चांगल्या प्रकारे डोक्यात ठेवून आता पाहा की इस्लाम मानव-अधिकारांची कोणती कल्पना प्रस्तुत करतो.

# केवळ मानवी अधिकार

## मानव म्हणून मानवाचे अधिकार

सर्वप्रथम जे या बाबतीत आम्हाला इस्लाममध्ये आढळते ते असे आहे की, इस्लाम स्वत:च मानव म्हणून मानवाचे काही हक्क व अधिकार निश्चित करतो. दुसऱ्या शब्दांत याचा अर्थ असा होतो की प्रत्येक मनुष्य, मग तो आमच्या देशाचा व आमच्या जन्मभूमीचा असो अथवा एखाद्या अन्य देशाचा व जन्मभूमीचा असो, आमच्या जातीचा अथवा एखाद्या अन्य जातीचा असो, मुस्लिम असो अथवा मुस्लिमेतर असो, एखाद्या जंगलात राहणारा असो अथवा वाळवंटातील असो, कोणत्याही परिस्थितीत केवळ मनुष्य म्हणून त्याचे काही हक्क व अधिकार आहेत. ते एक मुस्लिम अनिवार्यपणे देईल आणि त्याचे कर्तव्य आहे की त्याने द्यावेत.

## १. जिवंत राहण्याचा अधिकार

यात सर्वप्रथम गोष्ट म्हणजे जिवंत राहण्याचा अधिकार व मानवी जीविताच्या आदराचे कर्तव्य होय. कुरआनमध्ये फर्माविले गेले आहे,

"ज्याने एखाद्या माणसाला खुनाबद्दल अथवा पृथ्वीतलावर उपद्रव पसरविण्याव्यतिरिक्त अन्य कारणाने ठार केले तर त्याने जणू काही सर्व मानवांना ठार केले." (दिव्य कुरआन, ५:३२)

जेथपावेतो खुनाचा सूड उगविण्याचा अथवा पृथ्वीवर उपद्रव माजविण्याची शिक्षा देण्याचा प्रश्न आहे,याचा निर्णय एखादे न्यायालयच करू शकते. अथवा एखाद्या जातीशी युद्ध असेल तर एखादे राज्यच याचा निर्णय लावू शकते. कोणत्याही परिस्थितीत एखाद्या माणसाला व्यक्तिगत रूपाने हा अधिकार नाही की त्याने खुनाचा बदला घ्यावा अथवा पृथ्वीवर उपद्रव माजविण्याची शिक्षा द्यावी. म्हणून प्रत्येक माणसासाठी हे आवश्यक आहे की त्याने एखाद्या माणसाला कदापि ठार करू नये. जर एखाद्याने एखाद्या माणसाला ठार केले तर ते असे आहे जणू त्याने संपूर्ण मानवजातीला ठार केले. हीच गोष्ट दुसऱ्या ठिकाणी कुरआनमध्ये अशा प्रकारे पुन्हा सांगितली आहे,

"आणि कोणत्याही जीवाला ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले आहे ठार करू नका परंतु न्यायसंगत (असेल तर)." (दिव्य कुरआन, ६:५२)

येथेसुद्धा अशा खुनाच्या मनाईला अशा खुनापासून वेगळे केले गेले आहे, जो

सत्याधिष्ठित असेल आणि सत्याचा निर्णय कोणत्याही परिस्थितीत एखादे अधिकारसंपन्न न्यायालयच करील. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एखाद्याचे जीव घेण्याला अनेकेश्वरवादानंतर सर्वांत मोठे पाप ठरविले आहे.

"सर्वांत मोठे पाप अनेकेश्वरवाद व एखाद्याला ठार करणे होय." (हदीस)

या सर्व आयती व हदीसमध्ये स्वतंत्रपणे 'नफ्स' (जीव) या शब्दाचा प्रयोग केला गेला आहे, जो कोणत्याही विशिष्ट जीवासाठी नाही तर त्याचा अर्थ असा की आपली जात किंवा आपल्या देशाचे नागरिक किंवा एखाद्या विशिष्ट वंश, वर्ण अथवा जन्मभूमी किंवा धर्माच्या माणसाला ठार केले जाऊ नये. ही आज्ञा सर्व मानवांसाठी आहे आणि मुळात प्रत्येक मानवी जिवाला ठार करणे निषिद्ध ठरविले गेले आहे.

## २. मानवाला जिवंत राहण्याचा अधिकार केवळ इस्लामने दिला आहे.

आता आपण पाहा की जे लोक मानव-अधिकाराचे नाव घेतात, त्यांनी जर आपल्या राज्यघटनेत किंवा घोषणेत कोठे मानव-अधिकारांचा उल्लेख केला आहे. वास्तविकत: यात ही गोष्ट लपलेली (implied) असते की हे अधिकार एक तर त्यांच्या नागरिकांचे आहेत किंवा ते त्या अधिकारांना गौरवर्णियांसाठी विशिष्ट मानतात. ज्याप्रमाणे ऑस्ट्रेलियात मानवांची शिकार करून गौरवर्णियांसाठी मूळ रहिवाशांकडून जमीन खुली करून घेतली गेली आणि अमेरिकेत तेथील मूळ रहिवाशांचा वंशसंहार केला गेला आणि जे लोक वाचले त्यांना विशिष्ट प्रदेशात (Reservations) कैद करून ठेवले गेले आणि आफ्रिकेच्या विभिन्न प्रदेशांत घुसून लोकांना जनावराप्रमाणे ठार केले गेले. या सर्व गोष्टी असे सिध्द करतात की मानवी प्राणाचा 'मानव' म्हणून कोणत्याही प्रकारचा आदर त्यांच्या मनात नाही. जर काही आदर असेल तर आपली जात अथवा आपला वर्ण किंवा आपल्या वंशाच्या आधारावर आहे. परंतु इस्लाम सर्व मानवांसाठी हा अधिकार मान्य करतो. एखाद्या माणसाचा वन्य टोळ्याशी संबंध असेल तर इस्लाम त्यालासुद्धा मनुष्यच समजतो.

## ३. प्राण-रक्षणाचा अधिकार

पवित्र कुरआनची जी आयत मी प्रस्तुत केली आहे, तिच्यानंतर लगेच असे फर्माविले गेले आहे,

"आणि ज्याने कोणाला जीवनदान दिले त्याने जणू काही सर्व मानवजातीला जीवन प्रदान केले." (दिव्य कुरआन, ५:३२)

माणसाला मृत्युपासून वाचविण्याचे अनेक प्रकार आहेत. एक मनुष्य आजारी किंवा जखमी आहे, जर तो तुम्हाला आजारी असता किंवा जखमी असता आढळला तर हे तुमचे कर्तव्य आहे की त्याचा वंश, जात किंवा त्याचा रंग न पाहता त्याच्या आजार अथवा जखमेच्या उपचाराकडे लक्ष द्यावे. तो भुकेने मरत असेल तर आपले कर्तव्य आहे की त्याला जेवू घालावे, जेणेकरून त्याचा जीव वाचेल. तो बुडत असेल अथवा अन्य एखाद्या प्रकारे त्याच्या जीवाला धोका असेल तर आपले कर्तव्य आहे की त्याला वाचवावे. हे ऐकून आपल्याला आश्चर्य वाटेल की ज्यू लोकांचा धार्मिक ग्रंथ 'तलमूद'मध्ये हुबेहूब या आयतीचा आशय आहे. परंतु त्याचे शब्द असे आहेत, "ज्याने इस्त्राईल (ज्यू) पैकी एखाद्याचा जीव घेतला तर 'अल किताब' (Scripture) च्या दृष्टीने त्याने जणू संपूर्ण जगाला ठार केले आणि ज्याने इस्त्राईलपैकी एखाद्याचे प्राण वाचविले तर 'अल किताब' नुसार जणू त्याने संपूर्ण जगाचे रक्षण केले. 'तलमूद' मध्ये हेसुद्धा स्पष्ट लिहिले आहे की "जर एखादा इस्त्राईल नसलेला मनुष्य बुडत असेल आणि तुम्ही त्याला वाचविण्याचा प्रयत्न केला तर तुम्ही पापी ठराल." वंश-भक्तीचा चमत्कार पाहा. आम्ही प्रत्येक माणसाच्या प्राण-रक्षणाला आपले कर्तव्य मानतो. कारण पवित्र कुरआनने अशीच आज्ञा दिलेली आहे. परंतु ते वाचविणे आवश्यक मानतात तर केवळ बनी इस्त्राईलचेच प्राण, उरले अन्य लोक तर ज्यू धर्मात त्यांना मनुष्यच मानले जात नाही. त्यांच्याप्रमाणे 'गोयम' ज्याच्यासाठी इंग्रजीत "Gentile" आणि अरबी भाषेत 'उम्मी' हा शब्द प्रयुक्त होतो, त्याचा अर्थ असा आहे की त्यांना कोणतेही मानवी अधिकार नाहीत. मानवी अधिकार केवळ बनी इस्त्राईलनाच (ज्यू) आहेत. कुरआनमध्येसुद्धा याचा उल्लेख आलेला आहे,

"ते सांगतात, उम्मी (यहुदी-ज्यू खेरीज इतर लोक) लोकांच्या बाबतीत आमची काही विचारणा होणार नाही." (दिव्य कुरआन, ३:७५)

## ४. स्त्री-शीलाचा आदर

इस्लामने दिलेल्या मानव-अधिकारांपैकी तिसरी महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, स्त्रीची अब्रू व मान कोणत्याही परिस्थितीत आदरणीय आहे. मग स्त्री आपल्या जातीची असो किंवा

शत्रूच्या जातीची, ती जंगलात सापडली असो किंवा जिंकलेल्या शहरातील असो, आपल्या धर्माची असो की दुसऱ्या धर्माशी तिचा संबंध असो अथवा तिचा कोणताही धर्म असो, मुस्लिम कोणत्याही परिस्थितीत तिचे शील भ्रष्ट करू शकणार नाही. त्याच्यासाठी व्यभिचार निषिद्ध केला गेला आहे. मग हे कुकर्म कोणत्याही स्त्रीशी केले जावो. पवित्र कुरआनचे वचन असे आहे,

"व्यभिचाराच्या जवळसुद्धा फिरकू नका." (दिव्य कुरआन, १७:३२)

त्याचबरोबर अशा कृत्याची शिक्षासुद्धा ठरविली गेली आहे. या आज्ञेला कोणत्याही अटीचे बंधन नाही. स्त्रीचे शील व अब्रू भ्रष्ट करण्याची कोणत्याही परिस्थितीत मनाई आहे आणि जर एखाद्या मुस्लिमाने हे कृत्य केले तर तो त्याच्या शिक्षेपासून वाचू शकणार नाही. मग त्याला ही शिक्षा जगात मिळेल अथवा परलोकात. स्त्रीच्या सतीत्वाच्या आदराची कल्पना इस्लामशिवाय इतर कोठेही आढळत नाही. पाश्चिमात्य सैन्यांना आपल्या देशातसुद्धा 'काम-वासनेच्या पूर्ततेसाठी' आपल्या जातीच्याच कन्या हव्या असतात. अन्य जातीच्या देशावर त्यांना कब्जा मिळाला तर त्या देशातील स्त्रियांची जी दुर्दशा होते ती कोणापासून लपलेली नाही. परंतु मुस्लिमांचा इतिहास वैयक्तिक मानवी चुका वगळता यापासून रिक्त आहे. एखाद्या देशावर विजय मिळविल्यानंतर त्यांच्या फौजा सर्वत्र दुराचार करीत फिरत नाहीत. त्यांच्या स्वत:च्या देशात सरकारकडून त्यांच्यासाठी दुराचार (वासनापूर्ती) करण्याची काही व्यवस्था केलेली नसते. हीसुद्धा एक मोठी देणगी आहे जी मानवजातीला इस्लाममुळे प्राप्त झाली आहे.

## ९. प्रत्येक याचक व गरीबाचा हा हक्क आहे की त्याला मदत केली जावी.

पवित्र कुरआनमध्ये आज्ञा दिली गेली आहे,

"आणि त्यांच्या मालमत्तेत हक्क आहे याचकांचा आणि वंचितांचा."

(दिव्य कुरआन, ५१:१९)

पहिली गोष्ट तर अशी आहे की या आज्ञेत जे शब्द आलेले आहेत, ते सर्वांसाठी आहेत. त्यात एखाद्या विशिष्ट धर्मियाला मदत करण्यास सांगितले गेले नाही आणि दुसरे असे की ही आज्ञा मक्केत दिली गेली होती, जेथे मुस्लिम समाजाचे काही रीतसर अस्तित्वसुद्धा नव्हते आणि मुस्लिमांचा गैरमुस्लिम लोकांशीच संबंध होता. म्हणून कुरआनच्या सदर आयतीचा स्पष्ट अर्थ असा आहे की मुस्लिमांच्या संपत्तीवर प्रत्येक याचक, प्रत्येक गरीब आणि वंचित राहिलेल्या माणसाचा हक्क आहे. असे कदापि पाहिले जाणार नाही की तो आपल्या जातीचा किंवा आपल्या देशाचा आहे अथवा एखाद्या अन्य जात, देश अथवा वंशाशी त्याचा संबंध आहे. जर आपल्यात योग्यता आणि शक्ती असेल आणि एखाद्या गरजूने आपल्याकडे मदत मागितली अथवा आपणास

कळले की तो गरजू आहे, तर आपण त्याला अवश्य मदत करा. अल्लाहने तुमच्यावर त्याचा हा हक्क निश्चित केला आहे.

## ६. प्रत्येक माणसाला स्वातंत्र्याचा हक्क

इस्लाममध्ये एखाद्या स्वतंत्र माणसाला पकडून त्याला गुलाम बनविणे अथवा त्याला विकणे पूर्णत: निषिद्ध ठरविले गेले आहे. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे स्पष्ट शब्द आहेत, "तीन प्रकारचे लोक आहेत, ज्यांच्याविरुद्ध मी स्वत: दावा दाखल करीन. त्यांच्यापैकी एक तो मनुष्य जो एखाद्या स्वतंत्र मनुष्याला पकडून त्याला विकतो आणि त्याची किंमत खातो." पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या या फर्मानाचे शब्दसुद्धा सर्वसमावेशक आहेत. ते कोणत्याही विशिष्ट जाती अथवा वंश किंवा देश किंवा जन्मभूमीच्या माणसासाठी सांगितले गेले नाहीत. पाश्चात्य मंडळींना मोठा अभिमान आहे की त्यांनी गुलामगिरी संपुष्टात आणली. वास्तविकत: त्यांना हे पाऊल उचलण्यासाठी संधी गतशतकादरम्यान मिळाली. तत्पूर्वी ज्या प्रचंड प्रमाणावर ते आफ्रिकेतून स्वतंत्र लोकांना पकडून आपल्या नव-वसाहतीत घेऊन जात होते आणि ते त्यांच्याशी पशुपेक्षा वाईट व्यवहार करीत राहिले आहेत, त्याचे वर्णन त्यांनीच लिहिलेल्या पुस्तकांत आढळते.

## ७. गुलाम बनविणाऱ्या पाश्चिमात्य जाती

अमेरिका व भारताच्या पश्चिमी **बेटावर** या पाश्चिमात्य जातींना ताबा मिळाल्यानंतर साडेतीनशे वर्षांपर्यंत गुलामगिरीचा हा क्रूर व्यापार चालतच राहिला. आफ्रिकेच्या ज्या समुद्रतटावरील देशांतून काळ्या लोकांना पकडून आणले जात असे आणि बंदरातून त्यांना पुढे पाठविले जात असे, त्याला गुलामाचे समुद्र तट (Slave Coast) असे नाव पडले होते. केवळ एका शतकात (इसवी सन १६८० ते १७८६ पर्यंत) फक्त ब्रिटनने ताबा मिळविलेल्या प्रदेशासाठी जितके लोक पकडून नेले गेले त्यांची संख्या खुद्द ब्रिटनच्या लेखकांनी दोन कोटी होती असे लिहिले आहे. केवळ इ. सन १७९० या एका वर्षात ७५ हजार आफ्रिकन लोकांना पकडून गुलाम बनविले गेले. ज्या जहाजांतून त्यांना नेले जात असे, त्यात या आफ्रिकन लोकांना जनावराप्रमाणे खुपसून बंद केले जात असे आणि बहुतेकांना साखळदंडाने बांधले जात असे. त्यांना व्यवस्थितपणे जेवणही दिले जात नसे की आजारी पडल्यास अथवा जखमी झाल्यास त्यांच्या औषधोपचाराची चिंताही केली जात नसे. खुद्द पाश्चात्य लेखकांचे म्हणणे असे आहे की गुलाम बनविण्यासाठी व जबरदस्तीने सेवा करवून घेण्यासाठी जितक्या आफ्रिकन लोकांना पकडले गेले होते, त्यांच्यापैकी २० टक्के लोक प्रवासातच मृत्यूमुखी पडले. असाही अंदाज लावला गेला आहे की, सामूहिक रूपाने विभिन्न पाश्चिमात्य जातींनी जितक्या लोकांना पकडले होते, त्यांची संख्या दहा कोटींपर्यंत जाते. या संख्येत सर्व पाश्चिमात्य जातींनी बनविलेल्या गुलामांच्या संख्येचा समावेश आहे. असे आहेत हे लोक, जे रात्रंदिवस आम्हावर गुलामगिरी विधिवत

ठेवण्याचा आरोप करीत असतात.

## ८. इस्लाममध्ये गुलामगिरीचे स्थान

थोडक्यात मी आपणास हेसुद्धा सांगू इच्छितो की इस्लाममध्ये गुलामगिरीला काय स्थान आहे. अरबस्थानात इस्लामच्या पूर्वीपासून जे लोक गुलाम होते, इस्लामने त्यांचा प्रश्न असा सोडविला की विविध पद्धतीने शक्यतो त्यांना गुलामगिरीतून मुक्त करण्याची लोकांना प्रेरणा दिली. लोकांना आज्ञा दिली गेली की, त्यांनी आपल्या काही पाप-कृत्यांचे प्रायश्चित्त म्हणून गुलामांना मुक्त करावे. आपल्या खुशीने खुद्द एखाद्या गुलामाला मुक्त करण्यास एक महान पुण्य-कर्म ठरविले गेले. येथपर्यंत म्हटले गेले की मुक्त करणाऱ्याचा प्रत्येक अवयव त्या गुलामाच्या प्रत्येक अवयवाबद्दल नरकाच्या अग्नीपासून वाचविला जाईल. याचा परिणाम असा झाला की, खिलाफते - राशिदाचा चार आदर्श खलिफा (पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यानंतर इस्लामी-सिद्धांतावर आधारित शासन-व्यवस्था एका विशिष्ट काळापर्यंत टिकून राहिली. हाच काळ 'खिलाफते-राशिदा' चा काळ म्हणून संबोधला जातो.) काळ येईपर्यंत अरबस्तानातील सर्व जुने गुलाम मुक्त झाले.

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वत: ६३ गुलामांना मुक्त केले. माननीय आयेशा (रजि.) यांनी मुक्त केलेल्या गुलामांची संख्या ६७ होती. माननीय अब्बास (रजि.) यांनी ७०, माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांनी १००० आणि माननीय अब्दुर्रहमान बिन औफ (रजि.) २०००० गुलाम खरेदी करून त्यांना मुक्त केले. असाच तपशील अनेक सहाबा (रजि.) यांच्या बाबतीत आलेला आहे की त्यांनी अल्लाहच्या अनेक दासांना गुलामगिरीतून मुक्त केले होते. अशा प्रकारे पुरातन काळातील गुलामगिरीची समस्या तीस-चाळीस वर्षात सोडविली गेली.

वर्तमानकाळात या समस्येची जी सोडवणूक ठरविली गेली आहे, ती अशी आहे की युद्धानंतर दोन्ही पक्षांच्या युद्धकैद्यांची अदलाबदल केली जावी. मुस्लिम या गोष्टीला पहिल्यापासून तयार होते. एवढेच नव्हे तर जेव्हा जेव्हा विरोधी पक्षाने कैद्यांची अदलाबदल मान्य केली तेव्हा मागेपुढे न पाहता त्याची अंमलबजावणी केली गेली. परंतु जर या वर्तमानकाळात एखाद्या युद्धात एखादे राष्ट्र पूर्णपणे हरले व जे त्याने आपल्या बळावर आपल्या सैनिकांना सोडवून नेले आणि पराभूत राष्ट्र उरलेच नाही की ज्याने आपल्या सैनिकांना सोडवून न्यावे, तर अनुभव असा आहे की पराभूत राष्ट्राच्या कैद्यांना गुलामगिरीपेक्षा वाईट स्थितीत ठेवले जाते. गत-विश्व

युद्धात रशियाने जर्मनी व जपानचे जे कैदी पकडले होते, त्यांचा शेवट कसा झाला ? त्यांचा हिशेब आजतागायत मिळालेला नाही. त्यांच्यापैकी किती जण जिवंत राहिले आणि किती जण मृत्युमुखी पडले, याचा थांगपत्ता अद्याप लागलेला नाही. त्यांच्याकडून जी सेवा घेतली गेली, ती गुलामगिरीच्या सेवेपेक्षा निकृष्ट होती. कदाचित फिरौनच्या काळातसुद्धा अहराम बनविण्यासाठी गुलामाकडून तितकी क्रूरतापूर्ण सेवा घेतली गेली नसेल, जितकी रशियामध्ये साइबेरिया व मागासलेल्या प्रदेशांच्या सुधारणेसाठी युद्धकैद्यांकडून घेतली गेली. आता पुन्हा मी मूळ विषयाकडे वळतो.

## ९. प्रत्येक माणसाचा अधिकार आहे की त्याच्याशी न्याय केला जावा

हा एक फार महत्त्वाचा अधिकार आहे, जो इस्लामने मानवाला मानव म्हणून दिला आहे. कुरआनमध्ये आहे,

''एखाद्या गटाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके प्रक्षोभित करू नये की तुम्ही न्यायापासून विमुख व्हाल. न्याय करा.'' (दिव्य कुरआन, ५:८)

पुढे याच बाबतीत पुन्हा म्हटले गेले आहे,

आणि एखाद्या समूहाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके उत्तेजित करू नये की तुम्ही न्यायापासून दूर जावे. न्याय करा, हेच धर्मपरायणतेच्या अधिक जवळ आहे.

एका अन्य ठिकाणी फर्मावले गेले आहे,

''हे इमानधारकांनो, अल्लाहसाठी सत्यावर अढळ राहणारे व न्यायाची ग्वाही देणारे बना.''
(दिव्य कुरआन, ५:८)

यावरून ज्ञात झाले की सामान्य मनुष्यच नव्हे तर शत्रूशीसुद्धा न्यायपूर्ण व्यवहार करणे आवश्यक आहे. अन्य शब्दांत, इस्लाम ज्या न्यायाचे आवाहन करीत आहे, ते केवळ आपल्या देशात राहणाऱ्यांसाठी अथवा आपल्या जातीच्या लोकांसाठी किंवा मुस्लिमांसाठीच नव्हे तर जगभरातील लोकांसाठी आहे. आम्ही कोणाशीही अन्याय करीत नाही. नेहमी आमचा व्यवहार असा असणे आवश्यक आहे की कोणत्याही माणसाला आमच्याकडून अन्यायाची शंकादेखील येऊ नये आणि आम्ही सर्वत्र प्रत्येक माणसाशी न्याय व्यवहार करण्याची दक्षता घ्यावी.

## १०. मानवी समानता

इस्लाम केवळ रंग व वंशाच्या भेदभावाशिवाय सर्व माणसांदरम्यान समानतेचा पुरस्कार करतो असे नव्हे, तर त्याला एक महत्त्वपूर्ण सत्य नियम ठरवितो. पवित्र कुरआनमध्ये महान अल्लाहने फर्माविले आहे,

"लोकहो, आम्ही तुम्हाला एका पुरुष व एका स्त्रीपासून निर्माण केले."

(दिव्य कुरआन, ४९:१३)

दुसऱ्या शब्दात याचा अर्थ असा झाला की सर्व मानव मुळात भाऊ भाऊ आहेत. एकाच आई व वडिलाची संतती आहेत.

"आणि आम्ही तुम्हाला वंश व समूहात विभाजित केले, जेणेकरून तुम्ही एकमेकाला ओळखावे." (दिव्य कुरआन, ४९:१३)

म्हणजे वंश व समूहातील विभाजन ओळखण्यासाठी होय. ते अशासाठी आहे की, एका समूहात व एका वंशाच्या लोकांचा एकमेकांशी परिचय व्हावा आणि त्यांनी एकमेकांशी सहकार्य करावे. हे अशासाठी नव्हे की एका वंशाने दुसऱ्यावर श्रेष्ठत्व दाखवावे आणि त्याच्याशी अभिमानाने वागावे, त्याला निर्बल व नीच समजावे आणि त्याच्या अधिकारांवर दरोडा घालावा.

"वास्तविकत: अल्लाहजवळ तुमच्यापैकी सर्वात जास्त प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वात जास्त ईशपरायण आहे." (दिव्य कुरआन, ४९:१३)

याचा अर्थ असा झाला की माणसावर माणसाचे श्रेष्ठत्व केवळ पवित्र चारित्र्य व उत्तम आचरणावर आधारित आहे. रंग, वंश, भाषा अथवा स्वदेशावर आधारित नाही. हा मोठेपणदेखील अशासाठी नव्हे की सत्‌चरित्र व सदाचारी लोकांनी इतरांवर आपले श्रेष्ठत्व गाजवावे, कारण मोठेपणा गाजविणे खुद्द एक वाईट गोष्ट आहे, जी एखादी धार्मिक आणि ईशभीरू व्यक्ती करू शकत नाही. आणि अशासाठीसुद्धा नव्हे की, सदाचारी व्यक्तीचे अधिकार दुर्जनापेक्षा श्रेष्ठतर आहेत अथवा तिचे अधिकार त्याच्यापेक्षा जास्त आहेत. कारण हे मानवी समानतेच्या विरुध्द आहे, ज्याचा उल्लेख व सवयीच्या प्रारंभी नियम म्हणून आलेला आहे. हा मोठेपणा व सन्मान मुळात या कारणास्तव आहे की सदाचार व चांगुलपणा नैतिकदृष्ट्या दुराचाराच्या तुलनेत कोणत्याही परिस्थितीत श्रेष्ठ आहे. हीच गोष्ट अल्लाहच्या पैगंबरांनी एका हदीसमध्ये सांगितले आहे.

"कोणत्याही अरबाला एखाद्या अरब नसलेल्या व्यक्तीवर कोणत्याही प्रकारचे श्रेष्ठत्व नाही की कोणत्याही अरब नसलेल्या व्यक्तीला अरबावर श्रेष्ठत्व नाही. गोऱ्याला काळ्यावर आणि

काळ्याला एखाद्या गोऱ्यावर श्रेष्ठत्व नाही. तुम्ही सर्व आदम (अ.) यांची संतती आहात व आदम (अ.) यांचा जन्म मातीपासून झाला होता.''

अशा प्रकारे इस्लामने संपूर्ण मानवजातीत समानता प्रस्थापित केली आणि वर्ण, वंश, भाषा व राष्ट्राच्या आधारे होणाऱ्या सर्व भेदभावांचे मूळ कापून टाकले. इस्लामप्रमाणे मानवाला हा अधिकार मानव म्हणून प्राप्त आहे की जेणेकरून त्याच्याशी त्याच्या त्वचेचा रंग अथवा त्याचे जन्मस्थळ किंवा त्याला जन्म देणाऱ्या वंश व जातीच्या आधारे भेदभाव केला जाऊ नये. त्याला अन्य लोकांच्या तुलनेत नीच ठरविले जाऊ नये आणि त्याचे अधिकार इतरांपेक्षा कमी केले जाऊ नयेत. अमेरिकेतील आफ्रिकन जातीच्या लोकांचा प्रसिद्ध पुढारी मॅल्कम इक्स जो काळ्या वंशाच्या नागरिकांचा पक्ष घेऊन गोऱ्या जातीच्या लोकांच्या विरुद्ध निरंतर कठोर संघर्ष करीत राहिला तो मुस्लिम झाल्यावर जेव्हा हज यात्रेला गेला तेव्हा तेथे त्याने पाहिले की, आशिया, आफ्रिका, युरोप, अमेरिकाच नव्हे तर सर्व ठिकाणाहून आणि प्रत्येक रंग व वंशाचे मुस्लिम एकाच पोषाखात एक अल्लाहच्या गृहाकडे जात आहेत, एकाच घराची प्रदक्षिणा करीत आहेत, एकत्र नमाज अदा करीत आहेत आणि त्यांच्यात कोणत्याही प्रकारचा भेदभाव नाही, तेव्हा तो मोठ्याने ओरडला की ही आहे रंग आणि वंशाच्या प्रश्नाची सोडवणूक. आजतागायत अमेरिकेत आम्ही करीत असलेली सोडवणूक योग्य नव्हे. आज खुद्द मुस्लिमेतर विचारवंतसुद्धा जे अंध भेदभाव आणि आपपरभावाने ग्रस्त नाहीत ते असे मानतात की हा प्रश्न ज्या सफलतेने इस्लामने सोडविला आहे, तसा अन्य कोणताही धर्म सोडवू शकलेला नाही.

## ११. कल्याणकारी कार्यात प्रत्येकाशी सहकार्य पण अपकृत्यात कोणाशीही सहयोग नाही.

इस्लामने एक महान सिद्धान्त प्रस्तुत केला आहे,

''जे कार्य पुण्याईचे व ईशपरायणतेचे आहे, त्यामध्ये सर्वांशी सहकार्य करा आणि जी पाप व अत्याचाराची कामे आहेत, त्यामध्ये कोणाशीही सहकार्य करू नका.''

(दिव्य कुरआन, ५:२)

याचा अर्थ असा आहे की जो मनुष्य सदाचार व ईशभीरूतेचे काम करील त्याच्याबाबतीत हे पाहू नका की तो उत्तरेकडील आहे की दक्षिणेकडील, त्याचा हा अधिकार आहे की आम्ही त्याच्याशी सहकार्य करावे. या उलट जो मनुष्य अपकृत्य व अत्याचारी कृत्य करील, मग तो आमचा जवळचा शेजारी असो अथवा नातेवाईक का असेना, त्याचा हा अधिकारसुद्धा नाही की

# युद्धात शत्रूचे अधिकार

## आंतरराष्ट्रीय कायद्याचे स्वरूप

इस्लामी राज्यातील नागरिकांचे हक्क व अधिकारासंबंधी सांगण्यापूर्वी मी हे स्पष्ट करू इच्छितो की इस्लामने शत्रूंच्या अधिकाराविषयी काय सांगितले आहे. युद्धातील शिष्टाचारासंबंधी जगाला कोणतीही कल्पना नव्हती. पाश्चिमात्य जगाला पहिल्यांदा याची कल्पना सतराव्या शतकातील विचारवंत ग्रोशियस (Grotius)द्वारे आली. परंतु आंतरराष्ट्रीय युद्ध-नियमांची रचना प्रत्यक्षपणे एकोणीसाव्या शतकाच्या मध्यापासून होण्यास सुरवात झाली. तत्पूर्वी युद्धाच्या शिष्टाचारांची कोणतीही कल्पना पाश्चिमात्य लोकांत आढळत नाही. युद्धात सर्व प्रकारचे जुलूम व अत्याचार केले जात असत आणि कोणत्याही प्रकारचे अधिकार युद्धात सामील असलेल्या राष्ट्रांचे मान्य केले जात नसत. एकोणीसाव्या शतकात व त्यानंतर आजतागायत जे नियम केले गेले आहेत, त्यांचे वास्तविक स्वरूप कायद्याचे नसून तहासारखे आहे. त्यांना आंतरराष्ट्रीय कायदा म्हणून संबोधणे म्हणजे खरोखर 'कायदा' शब्दाचा चुकीचा प्रयोग होय. त्याला कारण असे की कोणतेही राष्ट्र युद्धात त्यांची अंमलबजावणी करणे तोपर्यंत आवश्यक मानत नाही, जोपर्यंत शत्रूपक्ष त्यांचे पालन करीत नाही. दुसऱ्या शब्दांत असे की, युद्धाच्या या सभ्य नियमानुसार ही गोष्ट मान्य केली गेली आहे की, जर आमच्या शत्रूने त्या नियमांचा आदर केला तर आम्हीसुद्धा करू आणि जर त्याने युद्धात जुलमी पद्धतींचा अवलंब केला तर आम्हीसुद्धा निर्विघ्नपणे त्याच पद्धतींचा प्रयोग करू. हे स्पष्ट आहे की या गोष्टीला कायदा म्हणता येणार नाही. हेच कारण आहे की प्रत्येक युद्धात या तथाकथित आंतरराष्ट्रीय कायदे व नियमांची पायमल्ली करण्यात आली आणि प्रत्येक वेळी त्यांचे पुनरावलोकन केले गेले आणि त्यात फेरफार करण्यात आले.

## इस्लामी युद्ध-नियम व तहाचे स्वरूप

या उलट इस्लामने युद्धाचे जे शिष्टाचार सांगितले आहेत, त्यांचे खरे स्वरूप कायद्याचे आहे, कारण ते अल्लाह व त्याच्या पैगंबरांनी मुस्लिमांना दिलेले आदेश आहेत, ज्यांचे पालन आम्ही कोणत्याही परिस्थितीत करू, मग आमचा शत्रू काही का करीना. आता हे पाहणे प्रत्येक ज्ञानी माणसाचे काम आहे की जे युद्ध-नियम चौदाशे वर्षापूर्वी ठरविले गेले होते. त्यांचा अवलंब पाश्चिमात्य लोकांनी केला आहे किंवा नाही आणि त्यांचा अवलंब करूनदेखील ते युद्धाच्या सभ्य मर्यादांच्या त्या स्तरापर्यंत पोचू शकले आहेत किंवा नाही, जेथपर्यंत इस्लामने आम्हाला पोहचविले होते. बहुतेक वेळी पाश्चिमात्य लोक असा दावा करतात की, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सर्वकाही ज्यू व ख्रिश्चनांकडून घेतलेले आहे. म्हणून बायबलचेसुद्धा वाचन करा.

वंश व मातृभूमी अथवा भाषा आणि राष्ट्रीयतेच्या नावे त्याने आमचा सहयोग मागावा आणि त्याने आमच्याकडून अशी आशासुद्धा बाळगू नये की आम्ही त्याला सहकार्य करावे. आमच्यासाठी हेसुद्धा योग्य नव्हे की तो आमचा भाऊ का असेना, आम्ही त्याला सहकार्य देणार नाही. सदाचारी मग त्याच्याशी आमचे कोणतेही नाते असो, आम्ही त्याचे सहकारी व मदतनीस आहोत किंवा कमीतकमी हितचिंतक आणि त्याच्याविषयी शुभेच्छा बाळगणारे आहोत.

जेणेकरून आपणास हे कळावे की संस्कृतीच्या या दावेदारांचा पवित्र ग्रंथ युद्धाच्या कोणत्या पद्धती अवलंबिण्याचा आदेश देत आहे. (या उद्देशासाठी बायबलचे पुस्तक निर्गमन (exodus) पाठ ३४, पुस्तक गणना (Numbers) पाठ ३१, पुस्तक सूट (Deuteronomy)पाठ ३०-७-२ आणि पुस्तक यशूअ (Joseph) पाठ ६-८ चे वाचन पुरेसे आहे.)

सुरवातीलाच ही गोष्ट समजून घ्या की इस्लाममध्ये मनुष्याचे मनुष्य म्हणून जे अधिकार सांगितले आहेत, त्यांची पुन्हा उजळणी करण्याची आता गरज नाही. ते अधिकार लक्षात ठेवून पाहा की मनुष्याच्या शत्रूचे कोणते अधिकार इस्लामने ठरविले आहेत.

## युद्ध न करण्याचे अधिकार

इस्लाममध्ये सर्वप्रथम शत्रु-राष्ट्रातील युद्ध करणाऱ्या आणि युद्ध न करणाऱ्या लोकांत फरक केला गेला आहे. जेथपावेतो युद्ध न करणाऱ्या लोकांचा संबंध आहे (म्हणजे जे लढणारे नाहीत अथवा लढण्यास योग्य नाहीत. उदा. स्त्रिया, मुले, म्हातारे, आजारी, आंधळे, विकलांग लोक वगैरे) त्यांच्या बाबतीत अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे खालीलप्रमाणे आदेश आहेत.

## जे लढणारे नाहीत त्यांना ठार केले जाऊ नये.

"एखाद्या म्हाताऱ्याला, एखाद्या मुलाला किंवा एखाद्या स्त्रीला ठार करू नका."

"मठात बसलेल्या संन्याशाला ठार करू नका अथवा प्रार्थनास्थळी बसलेल्या लोकांना मारू नका."

युद्धात एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका स्त्रीचे प्रेत पाहिले. तेव्हा ते म्हणाले, "ही तर लढत नव्हती." यावरून इस्लामी कायदेतज्ज्ञांना हा सिद्धान्त कळला की जे लोक लढत नाहीत त्यांना ठार केले जाऊ नये.

## युद्ध करण्याचे अधिकार

यानंतर पाहा की इस्लामने लढणाऱ्यांना कोणते अधिकार दिले आहेत.

## १. अग्नीची यातना दिली जाऊ नये.

हदीस (पैगंबरांचे वचन) मध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "अग्नीची यातना देणे अग्नीच्या पालनकर्त्याशिवाय इतर कोणालाही शोभा देत नाही." यावरून ही आज्ञा निघाली की शत्रूला जिवंत जाळण्यात येऊ नये.

## २. जखमीवर हल्ला केला जाऊ नये.

"कोणत्याही जखमीवर हल्ला करू नका." म्हणजे तो जखमी जो लढण्यास समर्थ नसावा आणि प्रत्यक्षपणे लढत नसावा.

## ३. कैद्याला ठार केले जाऊ नये.

कोणत्याही कैद्याला ठार केले जाऊ नये.

## ४. बांधून ठार केले जाऊ नये.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी बांधून ठार करणे अथवा तुरुंगवासात ठार करण्यास मनाई केली. पैगंबरांचे हे वचन उद्धृत करणारे माननीय अबू अय्यूब अन्सारी (रजि.) म्हणतात की ज्या अल्लाहच्या हातात माझे प्राण आहे त्याची शपथ घेऊन मी म्हणतो, "मी कोणत्या पक्षालासुद्धा बांधून मारणार नाही."

## ५. शत्रुराष्ट्रात आम कत्तल अथवा लुटमार केली जाऊ नये.

असाही आदेश दिला गेला आहे, "शत्रूच्या देशात प्रवेश कराल तर सर्वत्र विनाश पसरवू नका. वस्त्या निर्जन करू नका. जे लोक तुमच्याशी लढत आहेत त्यांच्याशिवाय कोणाच्या संपत्तीला हात लावू नका." हदीसमध्ये म्हटले गेले आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लूटमार करण्यास मनाई केली आहे आणि पैगंबरांचे कथन होते, "युद्ध संपत्ती मृत प्राण्यापेक्षा अधिक वैध नाही." म्हणजे तीसुद्धा मृत प्राण्याप्रमाणेच निषिद्ध आहे. माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) फौजांना निरोप देताना आदेश देत असत, "वस्त्या निर्जन करू नका. शेती आणि बागा उद्‌ध्वस्त करू नका. जनावरांना ठार करू नका." (युद्धातील शत्रूच्या तळातील युद्धसंपत्ती बाब यापेक्षा वेगळी आहे.) याचा अर्थ ती मालमत्ता जी शत्रूच्या फौजा, त्याचे सैनिक तळ आणि छावण्यात आढळते. इस्लामी फौजा ती अवश्य आपल्या ताब्यात घेतील, परंतु त्या सर्रास आम लूटमार करू शकत नाहीत.

## ६. जिंकलेल्या प्रदेशातील लोकांकडून कोणतीही वस्तू फुकट अथवा विना परवानगी घेतली जाऊ नये.

या गोष्टीलादेखील मनाई केली गेली आहे की सर्वसामान्य वस्तीच्या कोणत्याही वस्तूचा लाभ त्याबदल्यात काही दिल्याशिवाय घेतला जाऊ नये. युद्धाच्या दरम्यान जर शत्रूच्या एखाद्या प्रदेशावर ताबा मिळवून मुस्लिमांच्या फौजेने तेथे तळ ठोकला असेल तर फौजेला हा अधिकार

पोचत नाही की तिने लोकांच्या वस्तूंचा निर्विघ्न उपयोग करावा. जर तिला एखाद्या वस्तूची गरज असेल तर ती खरेदी करावी किंवा मालकाच्या परवानगीने तिचा उपयोग केला पाहिजे. माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) फौजांना निरोप देताना येथपर्यंत सांगत असत की "दूध देणाऱ्या जनावरांचे दूधदेखील तुम्ही पिऊ शकत नाही जोपर्यंत त्यांच्या मालकांची परवानगी घेतली जात नाही."

## ७. शत्रूच्या प्रेतावर राग उतरवू नये.

इस्लामने पूर्णपणे स्पष्ट आदेश दिला आहे की शत्रूच्या प्रेतांचा अनादर करू नका अथवा त्यांना विद्रुप करु नका. हदीसमध्ये आले आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी शत्रूंच्या प्रेतांना कापणे, मारणे अथवा विद्रुप करण्यास मनाई केली आहे. हा आदेश ज्याप्रसंगी दिला गेला आहे, तोदेखील मोठी शिकवण देणारा आहे. उहदच्या युद्धात जे मुस्लिम हुतात्मा झाले होते, शत्रूंनी त्यांचे नाक कापून त्यापासून हार बनविले होते आणि गळ्यात घातले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे चुलते माननीय हमजा (रजि.) यांचे पोट फाडून त्यांचे काळीज काढले गेले व ते चावण्याचा प्रयत्न केला गेला. त्या वेळी मुस्लिमांच्या क्रोधाची सीमा राहिली नव्हती. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले, "तुम्ही शत्रुराष्ट्राच्या प्रेतांशी असा व्यवहार करू नका." यावरूनच हा निष्कर्ष काढला जाऊ शकतो की हा धर्म अल्लाहनेच पाठविलेला धर्म आहे. यात मानवी भावनांचा जर हात असता तर उहदच्या युद्धात हे दृश्य पाहून ही आज्ञा दिली गेली असती की तुम्हीसुद्धा शत्रु-सैन्याच्या प्रेतांचा अशाच प्रकारे अनादर करा.

## ८. शत्रूची प्रेते त्यांच्या ताब्यात द्या.

अहजाबच्या युद्धात शत्रूचा एक प्रसिद्ध घोडेस्वार मरून खाईत पडला. अनेकेश्वरवादी शत्रूंनी अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासमोर दहा हजार दीनार सादर केले की त्याचे प्रेत आम्हाला देण्यात यावे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की "मी प्रेतांचा व्यापारी नाही. तुम्ही तुमचे प्रेत घेऊन जा."

## ९. वचनभंगास सक्त मनाई.

इस्लाममध्ये वचनभंग करण्यासदेखील सक्त मनाई केली आहे. पैगंबर मुहम्मद (स.) फौजा पाठविताना जे आदेश देत असत त्यापैकी एक असा असे की "वचनभंग करू नका." पवित्र कुरआन व हदीसमध्ये या आज्ञेची पुनरावृत्ती वारंवार केली गेली आहे की जर शत्रूने वचनभंग केला तरी तुम्ही वचनभंग करू नका. हुदैबियाच्या तहाची प्रसिद्ध घटना अशी आहे की तह

करावयाचे ठरल्यानंतर एक तरुण अबू जन्दल (रजि.) ज्यांचा पिता तहाच्या अटी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी ठरवीत होता, बेड्यानी जकडलेल्या स्थितीत धावत येऊन अबू जन्दल म्हणाले, "मुस्लिमांनो मला वाचवा !" पैगंबर मुहम्मद (स.) त्यांना म्हणाले, "ठराव झालेला आहे. आता आम्ही तुम्हाला मदत करू शकत नाही. तुम्ही परत जा, अल्लाह तुमच्यासाठी मार्ग उघडा करील. त्यांची दयनीय दशा पाहून मुस्लिमांच्या संपूर्ण सैन्याला रडू कोसळले. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जेव्हा सांगितले, "आम्ही वचन मोडू शकत नाही" तेव्हा एकजणसुद्धा त्यांना वाचविण्यासाठी पुढे सरसावला नाही आणि अनेकेश्वरवादी त्यांना बळजबरीने फरफटत घेऊन गेले. हे वचन पाळण्याचे उत्तम उदाहरण होय आणि इस्लाममध्ये अशी अनेक उदाहरणे आहेत.

## १०. युद्धापूर्वी युद्धाची घोषणा करण्याची आज्ञा.

पवित्र कुरआनमध्ये फर्माविले गेले आहे,

"आणि जर तुम्हाला एखाद्या लोकसमुदायाकडून दगलबाजीची भीती असेल तर त्यांचे करार जाहीरपणे त्यांच्या तोंडावर फेकून द्या." (दिव्य कुरआन, ८:५८)

या आयतीमध्ये या गोष्टीस मनाई केली गेली आहे की युद्धाची घोषणा केल्याशिवाय शत्रूशी युद्ध त्या स्थितीत सुरु केले जावे की जेव्हा शत्रूने आक्रमक कार्यवाही सुरू केली असेल. जर शत्रूपक्षाने घोषणा न करता आक्रमक कार्यवाही सुरु केली तर मग आम्हीसुद्धा घोषणा न करता त्याच्याविरुद्ध युद्ध करू शकतो. नाहीतर पवित्र कुरआन आम्हाला ही आज्ञा देत आहे की घोषणा करून त्याला सांगा आता आमच्या आणि तुमच्या दरम्यान कोणताही करार उरला नाही आणि आता आम्ही व तुम्ही युद्धस्थितीत आहोत. जरी वर्तमान आंतरराष्ट्रीय कायद्याचीसुद्धा हीच अपेक्षा आहे की युद्धाची घोषणा केल्याशिवाय युद्ध केले जाऊ नये. परंतु विसाव्या शतकात सर्व महायुद्धे घोषणा न करता सुरू झाली. तो त्यांनी स्वत: बनविलेला कायदा आहे. म्हणून ते स्वत:च्याच कायद्याचे उल्लंघन करण्यास स्वतंत्र आहेत. परंतु आमच्यासाठी हा अल्लाहने दिलेला कायदा आहे, आम्ही त्याचे उल्लंघन करू शकत नाही.

# इस्लामी राज्यात नागरिकांचे अधिकार

आता मी आपणास नागरिकांच्या अधिकारांसंबंधी सांगू इच्छितो. हे अधिकार त्या अधिकारांपेक्षा अधिक आहेत ज्यांचा उल्लेख मी यापूर्वी मनुष्य म्हणून, मनुष्याचे अधिकार म्हणून केला आहे.

## १. जीव व संपत्तीचे रक्षण

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या अंतिम हजप्रसंगी जे भाषण केले होते, त्यात फर्माविले होते की "तुमचे प्राण व तुमची संपत्ती एक दुसऱ्यासाठी कियामत (अंतिम-दिन, प्रलयकाळ) पर्यंत निषिद्ध आहे."

कुरआनोक्ती आहे,

"आणि जो अल्लाह व त्याच्या पैगंबराची अवज्ञा करील आणि त्याने ठरविलेल्या मर्यादांचे उल्लंघन करील त्याला अल्लाह आगीत टाकील ज्याच्यात तो सदैव राहील आणि त्याच्यासाठी अपमानकारक शिक्षा आहे."

(दिव्य कुरआन, ४:१४)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जिम्मी (इस्लामी राज्यातील मुस्लिमेतर प्रजा) बद्दल सांगितले, "मुआहिद (जिम्मी अथवा ज्यांच्याबरोबर करार झाला आहे) ला ज्याने ठार केले त्याला स्वर्गाचा सुगंधसुद्धा लाभणार नाही." कुरआन कोणालाही ठार करण्यास निषिद्ध ठरवितो. परंतु एखाद्याला फक्त सत्याधिष्ठित बाबीसाठी ठार करण्याची परवानगी देतो. हा वध असत्यावर आधारित नसावा, तर एखाद्या कायदेशीर सत्याची ही निकड असावी की त्या माणसाला ठार केले जावे आणि हे स्पष्ट आहे की सत्य-असत्याचा निर्णय केवळ न्यायालयच करू शकते. युद्ध व बंडाच्या स्थितीत एक न्यायी शासन आणि शरीअतप्रमाणे चालणारे शासनच हे ठरवू शकते की कोणते युद्ध न्यायसंगत आहे, ज्यात मानवी रक्त सांडणे धर्मानुकूल आहे आणि इस्लामी कायद्याच्या दृष्टीने कोण देशद्रोही ठरतो ज्याच्यावर तलवार उपसली जावी अथवा ज्याला मृत्यूदंड दिला जावा. असल्या निकालासाठी एखाद्या अशा न्यायालयावर अवलंबून राहता येणार नाही, ज्याला ईश्वराचे भय नसावे आणि त्याने शासनव्यवस्थेची भीती बाळगून निर्णय देत राहावे. तसेच एखाद्या अशा शासनाचे अपराध कुरआन व हदीसप्रमाणे कायदेशीर ठरू शकत नाहीत, जे निर्लज्जपणे आपल्या नागरिकांना केवळ अशासाठी उघड व लपवून ठार करीत असतील की सरकारच्या अनुचित कार्यवाहीसाठी त्यांचे सरकारशी मतभेद आहेत अथवा ते शासनावर टीका करतात आणि अशा शासनाच्या इशाऱ्यावर खुनासारखे मोठे अपराध करणाऱ्यांना उलट संरक्षण दिले जात असेल व त्यांच्याविरुद्ध कोणतीही पोलीस कार्यवाही न करता अशी व्यवस्था करावी की न्यायालयात कोणताही पुरावा व साक्ष जाऊ नये. अशा प्रकारच्या शासनाचे अस्तित्वच मुळी एक गुन्हा आहे, असे नव्हे की त्याच्या आज्ञेने कोणत्याही माणसाचा खून करण्यावर पवित्र कुरआनचा

शब्दप्रयोग 'कत्ल बिल्हक' (सत्याधिष्ठित मृत्यूदंड) लागू व्हावा.

प्राणाबरोबरच वित्त रक्षणाचा अधिकारसुद्धा इस्लामने स्पष्टपणे दिला आहे. जसे की मी आताच अंतिम हजच्या भाषणाच्या आधारे सांगितले आहे. इतकेच नव्हे तर पवित्र कुरआनने अल्लाहच्या कायद्याशिवाय एखाद्या अन्य प्रकारे लोकांची संपत्ती हस्तगत करण्यास पूर्णपणे निषिद्ध ठरविले आहे.

"आणि तुम्ही आपसामध्ये इतरांची संपत्ती अवैधपणे गिळंकृत करू नका"

(दिव्य कुरआन, २:१८८)

## २. अब्रू-रक्षण

दुसरा मोठा अधिकार एखाद्या नागरिकाच्या सन्मानाचे रक्षण होय. अंतिम हजप्रसंगी केलेल्या व्याख्यानाचा मी उल्लेख केलेला आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मुस्लिमांच्या केवळ जीव-वित्तालाच एक दुसऱ्यासाठी निषिद्ध ठरविले नव्हते, तर त्यांच्या सन्मान व अब्रूनुकसानीला अंतिम दिनापर्यंत (प्रलयकाळ) निषिद्ध ठरविले होते. पवित्र कुरआनमध्ये स्पष्ट आज्ञा आहे,

"हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, पुरुषांनी दुसऱ्या पुरुषांची टिंगल उडवू नये, शक्य आहे की ते त्यांच्यापेक्षा उत्तम असतील,आणि स्त्रियांनीसुद्धा दुसऱ्या स्त्रियांची टिंगल उडवू नये, शक्य आहे की त्या त्यांच्यापेक्षा उत्तम असतील."

(दिव्य कुरआन, २:१८८)

"आपापसांत एकमेकांना टोमणे (व्यंग) मारू नका"

(दिव्य कुरआन, ४९:११)

"आपापसांत एकमेकांना टोमणे (व्यंग) मारू नका आणि एकमेकांचा उल्लेख वाईट नावानेही करू नका." (दिव्य कुरआन, ४९:११)

"अधिक शंका घेण्यापासून दूर रहा" (दिव्य कुरआन, ४९:१२)

हा आहे आमचा अब्रू-रक्षणाचा कायदा आणि हा पाश्चिमात्यांच्या अब्रूनुकसानीच्या (Defamation) कायद्यापेक्षा कित्येक पटीने चांगला आहे. आमच्या कायद्याप्रमाणे जर ही गोष्ट सिद्ध झाली की एखाद्याने एखाद्याच्या अब्रूवर हल्ला केला आहे तर याची शहानिशा केल्याशिवाय की ज्याची अब्रूनुकसानी झाली आहे, कोणत्याही परिस्थितीत अब्रू-नुकसान करणाऱ्याला शिक्षा दिली जाईल. परंतु पाश्चिमात्यांच्या कायद्याचा चमत्कार असा आहे की मानहानीचा खटला भरणाऱ्याला प्रथम हे सिद्ध करावयाचे असते की तो सन्माननीय गृहस्थ आहे आणि या विवादात त्या बिचाऱ्याचा त्यापेक्षा अधिक अपमान व मानहानी होते ज्याची फिर्याद घेऊन तो न्यायालयाचे दार ठोठावयास गेला होता. याशिवाय काही अशा साक्षीदारांनासुद्धा त्याला हजर

करावे लागते, ज्यांच्या दृष्टीने तो खरोखरच अपराधीच्या अपमानित करणाऱ्या गोष्टीने अपमानित झालेला आहे. काय अजब कायद्याचे ज्ञान आहे हे! त्याला अल्लाहने बनविलेल्या कायद्यासमोर आणले जाते ? इस्लाम तर स्वत:च एखाद्या व्यक्तीच्या अपमानाला गुन्हा ठरवितो. मग ती व्यक्ती सन्माननीय असो किंवा नसो आणि अपमान करणाऱ्याच्या बोलण्याने खरोखर तिचा अपमान झाला असो किंवा नसो. इस्लामी कायद्यानुसार अपराधीचे हे कृत्य सिद्ध होणे, त्याला अपराधी ठरविण्यास पुरेसे आहे की त्याने ही सांगितली आहे, जी सर्वसामान्य बुद्धीनुसार (Common Sense) फिर्याद्याच्या अपमानास कारणीभूत ठरू शकते.

## ३. स्वत:च्या जीवनाचे संरक्षण

इस्लाम आपल्या राज्याच्या प्रत्येक नागरिकाचा हा अधिकार मानतो की त्याच्या वैयक्तिक जीवनात अयोग्य हस्तक्षेप होता कामा नये. पवित्र कुरआनची आज्ञा आहे,

"एक दुसऱ्याची हेरगिरी करीत राहू नका." (दिव्य कुरआन, ४९:१२)

"हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, आपल्या घराशिवाय दुसऱ्यांच्या घरात प्रवेश करीत जाऊ नका." (दिव्य कुरआन, २४:२७)

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी येथपर्यंत ताकीद दिलेली आहे की माणसाने स्वत: आपल्या घरात अचानक प्रवेश करू नये. तर कोणत्या न कोणत्या प्रकारे घरातील लोकांना सूचित करावे की तो आत प्रवेश करीत आहे. जेणेकरून आई, बहिणी आणि तरुण मुलीवर अशा स्थितीत दृष्टी पडू नये की ज्या स्थितीत त्यांना पाहिले जाऊ शकत नाही. आणि स्वत: त्या माणसालादेखील वाटते की त्यांना यास्थितीत पाहू नये. दुसऱ्यांच्या घरात डोकावण्याचा प्रयत्न करण्याससुद्धा सक्त मनाई आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे म्हणणे आहे की जर एखाद्या माणसाने दुसऱ्याला आपल्या घरात डोकावताना पाहिले आणि त्याने त्याचा डोळा फोडला तर तो दोषी ठरणार नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दुसऱ्याचे पत्रसुद्धा त्याच्या परवानगीशिवाय वाचण्यास मनाई केलेली आहे. येथ पावेतो की जर एखादा मनुष्य आपले पत्र वाचत असेल आणि दुसरा मनुष्य डोकावून ते वाचण्याचा प्रयत्न करीत असेल तर त्यालासुद्धा सक्त मनाई आहे. असा आहे माणसाच्या वैयक्तिकतेचा (Privacy) आदर ! तिकडे या नवीन सभ्यतेमुळे आमच्या जगाची अशी स्थिती आहे की केवळ दुसऱ्यांचे पत्र वाचलेच जाते, त्यांना सेन्सर केले जाते आणि त्यांच्या फोटोस्टॅट नकलाच ठेवल्या जातात असे नव्हे तर आता लोकांच्या घरात असले यंत्र लावले जातात ज्यांच्या सहाय्याने आपण लांब बसून ऐकत व पाहत राहावे की त्यांच्या घरात काय चाललेले आहे. याचा दुसरा अर्थ असा की आता वैयक्तिकता नावाची गोष्ट उरली नाही आणि माणसाच्या वैयक्तिक जीवनाचा व्यवहार्यत: अंत केला गेला आहे.

या हेरगिरीसाठी हा काही योग्य नैतिक तर्क नव्हे की शासन अट्टल गुन्हेगारांच्या रहस्यांची माहिती बाळगणे आवश्यक समजते. वस्तुत: त्याच्या मुळात ती शंका आहे, ज्याने हलीचे शासन

आपल्या त्या प्रत्येक नागरिकाला पाहते ज्यात त्याला काही समंजसपणा व सरकारी धोरणावर असमाधानाचा वास येतो. हीच ती गोष्ट आहे ज्याला इस्लाम राजकारणात बिघाडाचे मूळ ठरवितो. म्हणून अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे, "जेव्हा तत्कालीन शासक लोकांत शंकेची कारणे शोधू लागतो तेव्हा तो त्यात बिघाडच निर्माण करील." अमीर मुआविया (रजि.) यांचे कथन आहे की त्यांनी खुद्द पैगंबर मुहम्मद (स.) यांना असे म्हणताना ऐकले, "जर तुम्ही लोकांच्या गुप्त बाबी जाणून घेण्याचा प्रयत्न केला तर तुम्ही त्यांना बिघडवाल अथवा बिघाडासमीप पोचवाल." बिघडविण्याचा अर्थ असा आहे की जेव्हा लोकांचे रहस्य शोधण्यासाठी गुप्तहेर पसरविले जातात, तेव्हा लोक स्वत: एकमेकाला शंकेच्या दृष्टीने पाहू लागतात. येथपावेतो की स्वत:च्या घरातसुद्धा ते स्पष्ट बोलण्यास भितात की न जाणो आपल्याच मुलांच्या तोंडातून अशी एखादी गोष्ट निघून जाईल की ज्यामुळे आमच्यावर संकट येईल. अशाप्रकारे आपल्या घरातसुद्धा तोंड उघडणे माणसाला अवघड होते आणि समाजात सामान्यपणे एक अविश्वासाची स्थिती निर्माण होते.

## ४. वैयक्तिक स्वातंत्र्याचे संरक्षण

इस्लाम असाही नियम निश्चित करतो की एखाद्या माणसाला त्याचा गुन्हा न्यायालयात आणि तेही खुल्या न्यायालयात सिद्ध केल्याशिवाय अटक केली जाऊ नये. केवळ संशयावरून पकडणे आणि कोणतीही न्यायालयीन कारवाई न होता व आपले म्हणणे मांडण्याची संधी न देता अटक करणे इस्लाममध्ये वैध नाही. हदीसमध्ये आले आहे की पैगंबर मुहम्मद (स.) एकदा मस्जिदमध्ये खुतबा (भाषण) देत होते. भाषणाच्या दरम्यान एका माणसाने उठून सांगितले, "हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) माझ्या शेजाऱ्यांना कोणत्या गुन्ह्याखाली अटक केली गेली आहे ? "पैगंबरांनी ते ऐकले व भाषण सुरू ठेवले. त्याने पुन्हा उभे राहून हाच प्रश्न केला. पैगंबरांनी भाषण सुरु ठेवले. त्याने तिसऱ्यांदा उभे राहून हाच प्रश्न केला. तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आज्ञा दिली, "याच्या शेजाऱ्यांना सोडून द्या." दोन वेळा ऐकून गप्प राहण्याचे कारण असे होते की कोतवाल मस्जिदमध्ये उपस्थित होता. जर त्या माणसाच्या शेजाऱ्यांना अटक करण्याचे काही विशेष कारण असते तर कोतवालने ते सांगितले असते. जेव्हा त्याने कोणतेही कारण सांगितले नाही तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आज्ञा दिली की ज्या लोकांना अटक केली गेली आहे त्यांना सोडून दिले जावे. कोतवालला इस्लामी कायद्याने ज्ञान होते. म्हणून त्याने उभे राहून असे सांगितले नाही की "प्रशासनाला त्याच्या गुन्ह्याची कल्पना आहे आणि उघडपणे त्या अपराधाचे वर्णन केले जाऊ शकत नाही. जर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एकांतमध्ये विचारणा केली तर सांगितले जाईल."ही गोष्ट जर कोतवालने तोंडातून काढली असती तर त्यावेळी उभ्या-उभ्या त्याला नोकरीवरून काढले गेले असते. न्यायालयासाठी तर ही गोष्ट पुरेशी होती की कोतवालने अटक करण्याचे कोणतेही कारण खुल्या न्यायालयात सांगितले नाही. म्हणून लगेच मुक्ततेची आज्ञा दिली गेली होती. कुरआनचा स्पष्ट आदेश आहे,

"आणि जेव्हा लोकांदरम्यान न्यायनिवाडा कराल तेव्हा न्यायाने निवाडा करा."
(दिव्य कुरआन, ४:५८)

आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांची स्वत:ची आज्ञा होती,

"आणि मला आज्ञा दिली गेली आहे की मी तुमच्या दरम्यान न्याय करावा."
(दिव्य कुरआन, ४२:१५)

यामुळेच माननीय उमर (रजि.) यांनी सांगितले, "इस्लामनुसार कोणत्याही माणसाला न्यायाशिवाय कैद केले जाऊ शकत नाही."

यावरून स्पष्ट होते की न्यायाचा अन्वयार्थ योग्य न्यायालयीन कार्यवाही (Due Process of Law) आहे. ज्याला मनाई केली गेली आहे ती गोष्ट अशी आहे की एखाद्या माणसाला त्याच्या अपराधाचा पुरावा आणि न्यायालयात आपली बाजू मांडण्याची संधी दिल्याशिवाय पकडून अटक केली जावू नये. सरकारला एखाद्यावर असा संशय असेल की त्याने एखादा अपराध केला आहे अथवा तो एखादा अपराध करणार आहे, तर त्याला न्यायालयासमोर आपल्या संशयाचे कारण स्पष्ट केले पाहिजे. आणि अपराधी अथवा संशयिताने खुल्या न्यायालयात आपली बाजू मांडली पाहिजे, जेणेकरून न्यायालयाला हा निर्णय देणे शक्य व्हावे की त्या माणसावर संशय करण्यास काही योग्य पाया आहे किंवा नाही आणि जर योग्य पाया असल्यास त्याला अपराधापासून दूर ठेवण्यासाठी किती मुदतीपर्यंत कैदेत ठेवले पाहिजे. हा निकाल अनिवार्यपणे खुल्या न्यायालयात लागला पाहिजे. बंद खोलीत (In Camera) नव्हे जेणेकरून सरकारचा आरोप व आरोपीचा बचाव आणि न्यायालयाची कार्यवाही पाहून लोकांना कळावे की त्याला न्याय दिला जात आहे, अन्याय केला जात नाही.

या बाबतीत इस्लामची कार्यवाही खुद्द अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या एका निकालावरून कळते. अत्यंत प्रसिद्ध घटना आहे की मक्का शहरावर विजय प्राप्त करण्यासाठी जेव्हा अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) तयारी करण्यात मग्न होते तेव्हा माननीय हातिब बिन बल्तअ (रजि.) नावाच्या एका सहाबी (पैगंबरांचे सोबती) ने मक्का शहराच्या सरदारांच्या नावे एक पत्र लिहून त्या तयारीची माहिती दिली आणि ते पत्र एका स्त्रीच्या हाती मक्क्याला पाठविले. पैगंबरांना ही गोष्ट कळली. त्यांनी माननीय अली (रजि.) आणि माननीय जुबैर (रजि.) यांना आज्ञा दिली की, अमुक ठिकाणी जा, तेथे तुमची भेट एका स्त्रीशी होईल. तिच्याजवळ एक पत्र आहे. ते तिच्याकडून मिळवून घेऊन या. ते दोघे गेले आणि जी जागा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितली होती तेथेच ती स्त्री भेटली. दोघांनी तिच्याकडून ते पत्र घेतले आणि आणून पैगंबरांसमोर सादर केले. आता पाहा हा तर उघड देशद्रोहाचा प्रश्न होता. युद्धकाळात शत्रूला आपल्या फौजेच्या एका महत्त्वाच्या रहस्याची बातमी देणे आणि शत्रूला हल्ल्याची वार्ता वेळेपूर्वीच पोहचविणे एक असले कृत्य होते ज्याच्यापेक्षा अधिक भयंकर कृत्याची कल्पना केली जाऊ शकत नाही. बंद खोलीत

सुनावणीसाठी यापेक्षा अधिक योग्य आणखी कोणता खटला असणे शक्य होते. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मस्जिदे नबवीच्या खुल्या न्यायालयात शेकडो लोकांसमोर माननीय हातिब (रजि.) यांना बोलावून त्यांची चौकशी केली. ते म्हणतात, "हे अल्लाहचे पैगंबर! मी इस्लामशी द्रोह केला नाही. द्रोह करण्याच्या उद्देशाने मी हे काम केलेले नाही. वस्तुत: माझी मुले-बाळे तेथे आहेत आणि मक्क्यात माझे आप्तेष्ट नाहीत, जे माझ्या मुला-बाळांची बाजू घेतील, म्हणून मी हे पत्र लिहिले जेणेकरून मक्कावासियांनी माझे उपकार मानून माझ्या मुलाबाळांवर जबरदस्ती करू नये."

माननीय उमर (रजि.) उठून म्हणाले, "हे पैगंबर मुहम्मद (स.) मला परवानगी द्या की या द्रोह करणाऱ्याला मी ठार करावे." पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, "हे बदरच्या योद्ध्यांपैकी आहेत आणि यांनी आपल्या कामाचे जे कारण सांगितले आहे ते सत्यानुकूल आहे." पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या या निकालावर विचार करा. कृत्य स्पष्टपणे राष्ट्रद्रोहाचे होते. परंतु ते दोन गोष्टींसाठी माननीय हातिब (रजि.) यांना दोषमुक्त करतात. एक गोष्ट अशी की ते इस्लामशी द्रोह करू शकत नाहीत, कारण त्यांनी बदरसारख्या युद्धाच्या नाजुक स्थितीत आपल्या छातीचा कोट केला होता. दुसरे असे की मक्का शहरात त्यांची मुले बाळे खरोखरच संकटात होती. म्हणून जर त्यांच्याकडून ही चूक झालेली आहे तर त्यासाठी ही शिक्षा पुरेशी आहे की सर्वासमक्ष त्यांचे रहस्य उघडे पडले आणि इस्लामशी प्रामाणिक असलेल्या लोकांच्या दृष्टीत त्यांचा सम्मान कमी झाला. पवित्र कुरआनमध्येसुद्धा माननीय हातिब (रजि.) यांच्या या घटनेचा अल्लाहने उल्लेख केला आहे. परंतु धमकावणे व बरे-वाईट म्हणण्याशिवाय त्यांच्यासाठी कोणतीही शिक्षा निश्‍चित केली गेली नाही.

माननीय अली (रजि.) यांच्या काळात खारजींचा (बंडखोर) माननीय अली (रजि.) यांना खलीफा न मानणारा मुस्लिम पंथ नीति व्यवहार जसा होता तो इतिहासाच्या वाचकांपासून लपलेला नाही. ते माननीय अली (रजि.) यांना उघड-उघड शिव्या देत असत. त्यांना ठार करण्याच्यासुद्धा धमक्या देत असत. परंतु या गोष्टीसाठी जेव्हा जेव्हा त्यांना पकडले गेले तेव्हा त्यांना सोडून दिले आणि शासनाच्या अधिकाऱ्यांना सांगितले, "जोपर्यंत ते बंडखोरीच्या कारवाया करीत नाहीत, केवळ तोंडी विरोध व धमक्या अशा गोष्टी नाहीत की ज्यांच्यामुळे त्यांना पकडले जावे." इमाम अबू हनीफा अमीरुल मोमिनीनचे हे कथन उद्धत करतात की, "जोपर्यंत ते खुरुजचा (सशस्त्र बंडाचा) इरादा करीत नाहीत तोपर्यंत तत्कालीन खलीफा त्यांच्यावर कार्यवाही करणार नीहत." आणखी एका प्रसंगी माननीय अली (रजि.) खुत्बा (व्याख्यान) देत होते. खारजींनी आपली विशिष्ट घोषणा व्याख्यानादरम्यान दिली. यावर माननीय अली (रजि.) म्हणाले, "आम्ही तुम्हाला मस्जिदमध्ये येऊन अल्लाहचे स्मरण करण्यास प्रतिबंध करणार नाही आणि राज्याच्या संपत्तीपैकी तुमचा हक्क देणेसुद्धा बंद करणार नाही, जोपर्यंत तुमचे हात आमच्या हातासमवेत आहेत. (म्हणजे जोपर्यंत तुम्ही इस्लामच्या शत्रूच्या विरुद्ध युद्ध करण्यात

आमच्याबरोबर राहाल) आणि आम्ही तुमच्याशी कदापि युद्ध करणार नाही जोपर्यंत तुम्ही आमच्याशी युद्ध करीत नाही.'' आता पाहा, ज्या विरोधकांशी माननीय अली (रजि.) यांचा सामना होता, एखाद्या लोकतंत्र व्यवस्थेत त्याच्यापेक्षा अधिक तीव्र विरोधाची कल्पनासुद्धा केली जाऊ शकत नाही. परंतु याच्या तुलनेत जे स्वातंत्र्य त्यांनी दिले होते, तसले स्वातंत्र्य कोणत्याही शासनाने विरोधकांना दिलेले नाही. त्यांनी ठार मारण्याची धमकी देणारांनासुद्धा अटक केली नाही की त्यांची तुरुंगात रवानगी केली नाही.

## ५. अत्याचाराविरुद्ध आवाज उठविण्याचा अधिकार

इस्लामने दिलेल्या अधिकारांपैकी एक अधिकार अत्याचाराविरुद्ध आवाज उठविण्याचा आहे. अल्लाहचे कथन आहे,

''अल्लाह हे पसंत करीत नाही की माणसाने अपशब्दाकरिता तोंड उघडावे परंतु या व्यतिरिक्त की एखाद्यावर अत्याचार केला गेला असेल.''

(दिव्य कुरआन, ४:१४८)

याचा अर्थ असा की अल्लाह वाईट प्रकारे जिभेचा प्रयोग करण्यास अत्यंत नापसंत करतो. परंतु ज्या माणसावर अत्याचार केला गेला असेल, त्याला हा अधिकार आहे की त्याने उघडपणे अत्याचाराविरुद्ध आवाज उठवावा. हा अधिकार केवळ लोकांकरिताच आहे असे नव्हे, आयतचे शब्द सर्वांसाठीच आहेत. म्हणून जर एखाद्या माणसानेच नव्हे तर एखाद्या जमातीने अथवा समूहाने सरकारवर दबाव आणून लोकांवर किंवा जमातीवर अथवा देशाच्या संपूर्ण लोकसंख्येवर जुलूम करावयास सुरवात केली तर त्यांच्याविरुद्ध आम लोकांसमोर आवाज उठविण्याचा अल्लाहने दिलेला अधिकार आहे आणि हा अधिकार काढून घेण्याचा कोणालाही अधिकार नाही. आता जर एखाद्याने तो अल्लाहने दिलेला अधिकार काढून घेतला तर तो अल्लाहच्या विरुद्ध बंड ठरेल. एखादेवेळी १४४ कलम त्याला जगात वाचवून नेईल. परंतु अल्लाहच्या नरकाग्निपासून त्याला वाचविणे त्याच्या चमत्कारात समाविष्ट नाही.

## ६. आपले मत निर्भीडपणे मांडण्याचा अधिकार

इस्लामी राज्याच्या सर्व नागरिकांना आपले मत प्रकट करण्याचा अधिकार इस्लाम या अटीवर देतो की ते सदाचाराचा प्रसार करण्यासाठी असावे दुराचारासाठी नव्हे आपल्या मताची अभिव्यक्ती करण्याच्या स्वातंत्र्याची ही इस्लामी कल्पना वर्तमान पाश्चिमात्य कल्पनेपेक्षा अनेक पटीने चांगली आहे. दुराचाराच्या प्रसाराचे स्वातंत्र्य इस्लाम देत नाही. आलोचनेच्या नावाखाली अपशब्दांचा प्रयोग करण्याचीसुद्धा परवानगी देत नाही. तथापि इस्लामनुसार सदाचाराच्या प्रसारासाठी आपले मत व्यक्त करण्याचा अधिकार केवळ अधिकारच नव्हे, तर ते एक कर्तव्यसुद्धा आहे. त्याला रोखणे अल्लाहशी युद्ध ओढून घेणे होय आणि हीच गोष्ट दुराचाराला प्रतिबंध करण्याचीसुद्धा आहे. दुराचार मग तो कोणत्याही मनुष्य अथवा कोणतीही समुह किंवा खुद्द

आपल्या देशाचे किंवा दुसऱ्या देशाचे शासन करीत असेल, आपली जात की जगातील दुसरी कोणती जात, करीत असेल तर मुस्लिमांचा अधिकार आणि कर्तव्यसुद्धा आहे की त्या विरुद्ध आवाज उठवावा. त्याला प्रतिबंध करावा आणि त्याच्या विरुद्ध उघड-उघड नाराजी व्यक्त करून त्याला सांगावे की सदाचार काय आहे की ज्याचा अंगीकार व्यक्ती अथवा समाज किंवा शासनाने केला पाहिजे.

पवित्र कुरआनमध्ये मुस्लिमांना हे वैशिष्ट्य सांगितले आहे,

"ते सदाचाराचा उपदेश करणारे व दुराचारापासुन रोखणारे असतात."

(दिव्य कुरआन, ३:१०४)

याच्या उलट धर्मद्रोही (ढोंगी) लोकांचे हे वैशिष्ट्ये सांगितले गेले आहे,

"दुष्कर्माचा आदेश देतात आणि सत्कर्मापासून परावृत्त करतात आणि आपले हात सत्कर्मापासून रोखतात." (दिव्य कुरआन, ९:६७)

इमानधारकांसंबंधी फर्माविले गेले आहे की, त्यांचे राज्य होण्याचा उद्देशच असा आहे,

"हे ते लोक आहेत ज्यांना आम्ही जर पृथ्वीवर सत्ता बहाल केली तर ते नमाज कायम करतील, जकात देतील, सत्कर्माचा आदेश देतील आणि वाईटाला प्रतिबंध करतील."

(दिव्य कुरआन, २२:४१)

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचा आदेश आहे, "जर तुमच्यापैकी एखाद्या माणसाने दुराचार पाहिला तर ते त्याने हाताने रोखावे, जर हाताने रोखू शकला नाही तर जिभेने रोखावे, जर जिभेनेसुद्धा रोखू शकला नाही तर मनाने रोखावे. (म्हणजे कमीतकमी मनाने त्याला वाईट समजावे) आणि हा इमानचा खालचा दर्जा आहे. यानंतर इमानचा कोणताही दर्जा नाही." अशी आहे सदाचाराची आज्ञा देण्याची व दुराचारापासून रोखण्याची स्थिती. जर एखादे राज्य लोकांचा हा अधिकार हिरावून घेते आणि त्यांना हे कर्तव्य बजावण्याची संधी देत नाही, तर ते राज्य सरळ-सरळ अल्लाहच्या आज्ञेशी टक्कर घेत आहे. त्याचा सामना आमच्याशी नाही, सामना अल्लाहशी आहे. ते अल्लाहशी युद्ध करीत आहेत आणि तो अधिकार हिरावून घेत आहेत. त्याला अल्लाहने केवळ हक्कच नव्हे तर कर्तव्य ठरविले आहे आणि त्याची आज्ञा दिली आहे. उरले ते राज्य जे दुराचाराचा प्रसार करते आणि पसरू देते आणि सदाचाराचे आवाहन करणाऱ्यांच्या कामात विघ्न आणते तर ते कुरआनच्या दृष्टीने ढोंगी (धर्मद्रोही) कपटी लोकांचे राज्य आहे.

## ७. संघटना बनविणे व सभा आयोजित करण्याच्या स्वातंत्र्याचा अधिकार

संघटना बनविणे व सभा आयोजित करण्याचा अधिकारसुद्धा इस्लामने लोकांना दिला आहे. परंतु तोसुद्धा या अटीवर की त्या सदाचाराच्या प्रसारासाठी असाव्यात, दुराचाराच्या प्रसारासाठी नसाव्यात. अशा प्रकारच्या सभा व अशा तऱ्हेच्या संघटना बनविण्याचा केवळ हक्कच

नव्हे तर याची आज्ञासुद्धा दिली गेली आहे. पवित्र कुरआनमध्ये मुस्लिमांना उद्देशून फर्माविले गेले आहे,

"आता जगात तो सर्वोत्तम जनसमुदाय तुम्ही आहात ज्याला अखिल मानवजाती (च्या कल्याणा) साठी अस्तित्वात आणले गेले आहे. तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारापासून प्रतिबंध करता आणि अल्लाहवर श्रद्धा बाळगता."

(दिव्य कुरआन, ३:११०)

म्हणजे संपूर्ण मुस्लिम समाजाचेच हे काम आहे की त्यांनी सदाचाराचे लोकांना आवाहन करावे आणि दुराचारापासून रोखावे. परंतु जर सर्व मुस्लिम असे नसतील तर कमीतकमी,

"सद्वर्तनाचे आवाहन करणारा व चांगुलपणाचा आदेश देणारा, तसेच दुराचाराचा प्रतिबंध करणारा एक गट तुमच्यात अवश्य असला पाहिजे, अशा लोकांना साफल्य लाभेल."

(दिव्य कुरआन, ३:१०४)

यावरून स्पष्ट कळते की मुस्लिम समाज जर सामूहिक रूपाने सदाचाराचा प्रसार करणे व दुराचार रोखण्याच्या कर्तव्यापासून गाफिल झाला तर त्यांच्यापैकी एका जमातीचे अस्तित्वात असणे आवश्यक आहे, जी सदाचाराचा प्रसार करणे व दुराचारापासून रोखणे आणि पुण्यकार्याचे आवाहन करण्याची सेवा करू शकेल. हा हक्कच नव्हे तर कर्तव्य आहे. जे पूर्ण केल्यावरच यशप्राप्ती होऊ शकते. परंतु अल्लाहच्या धर्माशी ही एक अजब विडंबना आहे की मुस्लिमांच्या देशात दुराचाराचा प्रसार करण्यासाठी जी संघटना व जमात असेल तिला तर राज्य करण्याचा अधिकार आहे. पण भलेपणासाठी जी जमात बनेल तिच्यावर तर नेहमी धोक्याची टांगती तलवार जी त्याच्यावर केव्हा कोसळेल याची कल्पना नाही ! मुस्लिम देशांचा मामला अगदीच विपरीत आहे. दावा तर असा आहे की आम्ही मुस्लिम आहोत आणि हे इस्लामी राज्य आहे. परंतु त्यात दुराचाराच्या प्रसाराचे व सदाचारापासून रोखण्याचे काम होत आहे आणि जे सदाचाराचा प्रसार करण्याचा व दुराचार रोखण्याचा प्रयत्न करीत आहेत, त्यांचे जीवन दुष्कर केले जात आहे.

## ८. आंतरात्मा व आस्थेच्या स्वातंत्र्याचा अधिकार

इस्लाम आपल्या समाज व आपल्या राज्यात लोकांना अंतरात्मा व आस्थेच्या स्वातंत्र्याचा अधिकारसुद्धा देतो. पवित्र कुरआनमध्ये आले आहे,

"धर्मात कोणतीही जोरजबरदस्ती नाही." (दिव्य कुरआन, २:२५६)

वस्तुत: सत्यधर्मापेक्षा मोठे कोणतेही पुण्यकार्य नाही आणि मुस्लिम त्याचे आवाहन अवश्य करतील व त्याची सत्यता प्रमाणासह सिद्ध करतील. परंतु हे पुण्यकार्य लोकांवर दबाव आणून केले जाणार नाही. जो मनुष्य ते स्वीकारील ते आपल्या मर्जीने स्वीकारील. आम्ही त्याला हृदयाशी लावू आणि आपल्या समाजात अगदी बरोबरीच्या अधिकारासह त्याला सामील करून

घेऊ. परंतु जर कोणत्याही माणसाने ते मान्य केले नाही तर आम्ही त्याचा हा अधिकारसुद्धा मान्य करू की त्याने ते मान्य करू नये. त्याच्यावर कोणत्याही प्रकारे जोर जबरदस्ती केली जाणार नाही.

## ९. असा अधिकार की धर्माच्या आधारे एखाद्याला दुखविले जाऊ नये

अंतरात्मा व आस्थेच्या स्वातंत्र्याबरोबर इस्लामने लोकांना हासुद्धा अधिकार दिला आहे की त्यांच्या धार्मिक बाबतीत कोणतीही अशी गोष्ट केली जाऊ नये की ज्यामुळे त्यांचे मन दुखावे. पवित्र कुरआनमध्ये म्हटले गेले आहे,

"हे लोक अल्लाहशिवाय ज्याचा धावा करतात त्यांचा उपहास करू नका."

(दिव्य कुरआन, ६:१०९)

ही गोष्ट मूर्ती व दैवतांपर्यंतच मर्यादित नाही तर एखाद्या जातीच्या वयोवृद्ध व मार्गदर्शकासाठीसुद्धा हीच आज्ञा आहे. इस्लाम ही गोष्ट पसंत करीत नाही की जर आपल्या मते एखाद्या समूहाचा धार्मिक विश्वास चुकीचा आहे आणि तो त्या माणसांना आपले श्रद्धास्थान मानते जे आपल्या दृष्टीने श्रद्धेय नाहीत, आपण त्यांना शिवीगाळ सुरू करावी आणि आपल्या या असभ्य कृतीने त्यांना मानणाऱ्या लोकांचे मन दुखवावे. धार्मिक प्रश्नावर चर्चा करण्यास इस्लाम प्रतिबंध करीत नाही. परंतु तो इच्छितो की ही संस्कृती व सभ्यतेच्या वातावरणात व्हावी. पवित्र कुरआनमध्ये आहे,

"आणि ग्रंथधारकांशी वाद घालू नका परंतु उत्तम रीतीन."

(दिव्य कुरआन, २९:४६)

ही आज्ञा ग्रंथधारकांसाठीच नव्हे तर सर्वधार्मियांसाठी आहे.

## १०. एकाच्या अपराधासाठी दुसऱ्याला पकडले न जाण्याचा अधिकार

इस्लाम माणसाचा हासुद्धा अधिकार ठरवितो की त्याला दुसऱ्याच्या अपराधासाठी पकडले जाऊ नये. पवित्र कुरआनमध्ये हा सर्वसामान्य नियम सांगितला गेला आहे,

"एखादा ओझे उचलणारा दुसऱ्याचे ओझे उचलीत नाही."

(दिव्य कुरआन, ६:१६४)

दुसऱ्या शब्दात याचा अर्थ असा आहे की प्रत्येक मनुष्य आपल्या कर्मासाठी स्वत: जबाबदार आहे. जर दुसऱ्या एखाद्या माणसाच्या कर्मात तो भागीदार नाही तर त्याच्या जबाबदारीसाठी त्याला पकडले जाऊ शकत नाही.

दु:खाची गोष्ट अशी की या उघड न्यायसंगत व योग्य कायद्याचीसुद्धा, जो मानवाने बनविलेला नाही तर या सृष्टीच्या निर्मात्याने बनविलेला आहे, आम्ही पायमल्ली होताना पाहात

आहोत. गुन्हेगार एक मनुष्य आहे आणि पकडले मात्र जात आहे दुसऱ्याला. एक प्रसंग तर असा की कराचीतील एका माणसावर संशय घेतला गेला की तो एक बॉंब प्रकरणात अडकला आहे. तपासासाठी त्याला पकडून भयंकर यातना दिल्या गेल्या जेणे करून त्याने गुन्हा कबूल करावा. जेव्हा त्याने सांगितले, ''मी पूर्णपणे निरपराध आहे'' तेव्हा त्याची आई, त्याची पत्नी, त्याची मुलगी, त्याची बहीण सर्वांना पकडून आणले गेले. त्याच्यासमोर त्यांना आणि त्यांच्यासमोर त्या माणसाला नग्न केले गेले जेणेकरून त्याने गुन्हा कबूल करावा. जणु आता गुन्ह्याच्या तपासासाठी हेसुद्धा कायदेशीर झाले आहे की संशयित माणसावर दबाव आणण्यासाठी त्याच्या घरातील निरपराध स्त्रियांना नग्न केले जावे. ही अत्यंत लज्जास्पद बाब आहे. नीचपणाची पराकोटी आहे. मी ही निराधार गोष्ट सांगत नाही तर मला या घटनेचे पूर्ण ज्ञान आहे आणि मी हे सिद्ध करू शकतो. मी सांगतो की अशा जुलूम करणाऱ्यांना काय अधिकार आहे की त्यांनी सांगावे की आम्ही मुस्लिम आहोत आणि आम्ही इस्लामप्रमाणे शासन करीत आहोत आणि आमचे राज्य इस्लामी आहे. पवित्र कुरआनच्या एका सत्य कायद्याचा भंग करीत आहात. पुरुष व स्त्रियांना नग्न करता, जे इस्लाममध्ये पूर्णत: निषिद्ध आहे. मानवतेला लज्जित करता आणि वर म्हणता की आम्ही मुस्लिम आहोत ?

## ११. प्रत्येक गरजूचा अधिकार आहे की त्याला सहाय्य केले जावे.

इस्लाममध्ये गरजू लोकांना हा अधिकार दिला गेला आहे की त्यांना मदत केली जावी. पवित्र कुरआनमध्ये आहे,

''आणि त्यांच्या मालमत्तेत हक्क आहे याचकांचा आणि वंचितांचा.''

(दिव्य कुरआन, ५१:१९)

या आयतीत केवळ मदत मागणाऱ्याचा हक्क मुस्लिमांच्या संपत्तीत ठरविला गेला नाही, तर हीसुद्धा आज्ञा दिली गेली आहे की जर तुम्हाला कळाले की अमुक मनुष्य आपल्या जीवनोपयोगी वस्तूपासून वंचित राहिला आहे, तर हे न पाहता की तो मागतो की मागत नाही, तुमचे हे कर्तव्य आहे की तुम्ही त्याच्यापर्यंत पोचावे आणि त्याला मदत करावी. या कारणास्तव केवळ प्रसन्न मनाने अल्लाहच्या मार्गात खर्च करा, म्हणून पूर्णविराम दिला नाही तर जकातसुद्धा अनिवार्य केली गेली आहे याची व्याख्या अशी केली गेली आहे, ''ती मुस्लिमातील श्रीमंतांकडून घेतली जाते आणि गरिबांसाठी खर्च केली जाते.'' याचबरोबर इस्लामी शासनाचीसुद्धा ही जबाबदारी ठरविली गेली आहे की ज्याचा कोणी सहाय्यक नसेल त्याला मदत करावी. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे वचन आहे, ''बादशाह त्याचा पालक आहे, ज्याचा कोणीही पालक नाही.'' पालक (वली) या शब्दात खूप गर्भित अर्थ आहे. एखादा अनाथ, एखादा वृद्ध, एखादा विकलांग, एखादा बेरोजगार, एखादा आजारी मनुष्य जर अशा स्थितीत असेल की ज्याचा कोणीही आश्रयदाता नसेल, तर शासनाने त्याला आश्रय दिला पाहिजे. जर एखादे प्रेत असे असेल

की, ज्याचा कोणीही पालक अथवा वारस नसेल तर त्याची प्रेतयात्रा व त्याच्या अंतिम संस्काराची जबाबदारी सरकारची आहे. थोडक्यात हा मुळात आम वारसा आहे, ज्याची जबाबदारी इस्लामी राज्यावर येते.

## १२. कायद्याच्या दृष्टीने समानतेचा अधिकार

इस्लामी देशातील तमाम नागरिकांना कायद्याच्या दृष्टीने इस्लाम समान अधिकार देतो. जेथ पर्यंत मुस्लिमांचा संबंध आहे, त्यांच्या बाबतीत तर पवित्र कुरआन व हदीसमध्ये स्पष्टपणे सांगितले गेले आहे, "आपले अधिकार व योग्य बाबीत ते सर्व समान आहेत."

"इमानधारक तर एक दुसऱ्याचे भाऊ आहेत." (दिव्य कुरआन, ४९:१०)

"पण जर यांनी पश्चात्ताप केला व नमाज कायम केली व जकात दिली तर हे तुमचे धर्मबंधू आहेत." (दिव्य कुरआन, ९:११)

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे, "मुस्लिमांच्या रक्तासमान त्याच्या रक्ताचे आदर व मूल्य आहे." दुसऱ्या हदीसमध्ये आहे, "सर्व मुस्लिमांची जबाबदारी एकसमान आहे. त्यांचा सामान्य मनुष्यसुद्धा कोणालाही आश्रय व निर्भयता देऊ शकतो." अन्य एका हदीसमध्ये पैगंबर (स.) म्हणतात, "जे लोक अल्लाहला एक असल्याचे आणि त्याच्या पैगंबरांवर पैगंबरत्व मान्य करतील आणि सर्व प्रकारचे भेदभाव विसरून इस्लामी समाजात सामील होतील, त्यांचे अधिकार तेच आहेत जे अधिकार मुस्लिमांचे आहेत आणि त्यांची कर्तव्ये तीच आहेत जी मुस्लिमांची आहेत." हा धार्मिक बंधुभाव आणि अधिकार व कर्तव्यांची समानता इस्लामी समाजात समानतेचा आधार आहे आणि यात कोणाचेही अधिकार आणि कर्तव्य एखाद्या दुसऱ्याचा अधिकार व कर्तव्यापेक्षा कोणत्याही अर्थाने कमी वा अधिक नाहीत. उरले इस्लामी राज्यातील मुस्लिमेतर नागरिक तर त्यांच्या बाबतीत इस्लामी शरीअत (कायदा) चा कायदा खरे खलीफा माननीय अली (रजि.) यांनी या शब्दात विशद केला आहे, "त्यांनी आमची जबाबदारी कबूलच अशासाठी केली आहे की त्यांचे रक्त आमच्या रक्ताप्रमाणे आणि त्यांची संपत्ती आमच्या संपत्तीप्रमाणे व्हावी." दुसऱ्या शब्दात, त्यांच्या वित्त व प्राणाच्या रक्षणाची जबाबदारी एका इस्लामी राज्यावर तशीच आहे जशी मुस्लिमांच्या वित्त व प्राणाच्या रक्षणाची आहे. पवित्र कुरआन फिरऔनच्या सर्वात भयंकर अपराधांपैकी या अपराधाचीसुद्धा गणना करतो,

"तिच्या निवासीयांना गटागटांत विभागले. त्यांच्यापैकी एका गटाला तो अपमानित करीत असे." (दिव्य कुरआन, २८:४)

## १३. शासक कायद्यापेक्षा वरचढ नाहीत.

इस्लाम स्पष्टपणे असे इच्छितो की लहानापासून मोठ्यांपर्यंत सर्व अधिकारी, येथ पावेतो की राष्ट्रपतीसुद्धा कायद्याच्या दृष्टीने सामान्य नागरिकाप्रमाणे असावा, कोणीही कायद्यापेक्षा

वरचढ नसावा आणि कोणत्याही मोठ्यात मोठ्या व्यक्तीच्या विरुद्धसुद्धा एखाद्या सामान्य नागरिकाने आपल्या अधिकाराचा दावा घेऊन उभे राहावे. माननीय उमर (रजि.) यांचे कथन आहे, "मी स्वत: अल्लाहच्या पैगंबर मुहम्मद (स.) यांना स्वत: वर सूड उगवण्यास सांगताना पाहिले आहे. बदरच्या युद्धाची घटना आहे की, पैगंबर इस्लामी फौजेच्या रांगा सरळ करवीत होते. त्यांच्या हातात एक काठी होती. संयोगाने पुढे आलेल्या एका सैनिकाला मागे हटवीत असता त्यांची काठी त्याच्या पोटात टोचली गेली. तो म्हणाला की, आपण मला त्रास दिला. पैगंबरांनी लगेच आपले पोट उघडे केले की, तूसुद्धा माझ्या पोटात काठी टोच. त्याने पुढे सरसावून त्यांच्या पोटाचे चुंबन घेतले आणि म्हणाला की माझी हीच इच्छा होती."

चोरीच्या एका खटल्यात एका खानदानी स्त्रीला पकडले गेले. अशी शिफारस केली गेली की तिला क्षमा करावी व शिक्षा दिली जाऊ नये. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले, "तुमच्या पूर्वीचे लोकसमूह याच कारणामुळे नष्ट झाले की ते सामान्य लोकांवर शिक्षेची अंमलबजावणी करीत असत व खानदानी लोकांना माफ करीत असत. शपथ त्या अल्लाहची! ज्याच्या हातात मुहम्मदचे प्राण आहेत. जर मुहम्मदची कन्या फातिमा (रजि.) ने हे कृत्य केले असते तर मी तिचा हात कापला असता."

माननीय उमर (रजि.) यांच्या राज्यात इजिप्तचे गव्हर्नर माननीय अम्र बिन आस (रजि.) यांचा मुलगा मुहम्मदने एका इजिप्शियन माणसाला चाबकाचे फटके मारले. त्या इजिप्शियन माणसाने मदीनेला जाऊन खलीफाजवळ तक्रार केली. तेव्हा त्यांनी लगेच इजिप्तचे गव्हर्नर आणि त्यांचा मुलगा मुहम्मद्‌ला बोलावून घेतले आणि जेव्हा ते हजर झाले तेव्हा त्या इजिप्शियन माणसाच्या हातात चाबुक देऊन आज्ञा केली की गव्हर्नरच्या मुलाला त्यांच्यासमोर फटके मारले जावेत. मग जेव्हा तो आपला सूड घेऊन चाबुक माननीय उमर (रजि.) यांना परत करू लागला तेव्हा त्यांनी त्याला सांगितले, "चाबकाचा एक फटका या गव्हर्नर साहेबांनासुद्धा मार अल्लाहची शपथ! यांच्या मुलाने तुला कदापि मारले नसते, जर त्याला आपल्या वडिलांचा गर्व नसता." फिर्यादी म्हणाला, "ज्याने मला मारले होते त्याचा सूड मी घेतला आहे." माननीय उमर (रजि.) म्हणाले, "अल्लाहची शपथ! जर यांना तू मारले असते तर मी मध्ये पडलो नसतो. तू स्वत:च यांना सोडून दिले आहे." मग रागाने माननीय अम्र बिन आस यांच्याकडे पाहिले आणि म्हणाले, "हे अम्र ! तुम्ही केव्हापासून लोकांना गुलाम बनवून टाकले. वास्तविकत: त्यांच्या आईंनी त्यांना स्वतंत्र म्हणून जन्म दिला होता ?" इस्लामी राज्य जेव्हा आपल्या मूळ वैभवात प्रस्थापित होते तेव्हा त्या काळात स्थिती अशी होती की खुद्द तत्कालीन खलीफाच्या विरुद्ध खटले भरले जात असत आणि त्याला न्यायलयात हजर व्हावे लागत असे. आणि खलीफाची जर एखाद्याच्या विरुद्ध तक्रार असली तर तो स्वत:च्या अनुशासनसंबंधी असलेल्या अधिकारांचा प्रयोग करून तो आपली तक्रार निकालात काढीत नसे तर त्याचा निकाल न्यायालयाकडून लावून घेत असे.

## १४. अपराधापासून अलिप्त राहण्याचा अधिकार

इस्लाम आपल्या राज्यात प्रत्येक नागरिकाला हा अधिकारसुद्धा देतो की त्याला एखादा गुन्हा अथवा अपराध करण्याची आज्ञा दिली जाऊ नये. आणि जर एखाद्या शासनाने किंवा शासनकर्त्यांनि किंवा त्या माणसाच्या एखाद्या वरिष्ठ अधिकाऱ्याने त्याला अशी एखादी आज्ञा दिली तर त्याने आज्ञापालन करण्यास नकार द्यावा. त्याचा तो नकार इस्लामी कायद्याच्या दृष्टीने अपराध नाही तर गुन्हा करण्याची आज्ञा देणे अपराध आहे आणि त्यामुळे खुद्द तो शासनकर्ता पकडला जाण्यास पात्र आहे की ज्याने गुन्हा करण्याची आज्ञा दिली. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे स्पष्ट कथन हदीसमध्ये आहे, "अल्लाहच्या अवज्ञेत कोणत्याही माणसाचे आज्ञापालन नाही." या कायद्यानुसार अपराधी न्यायालयात आपली बाजू मांडताना असे सांगू शकत नाही की मी गुन्हा शासक अथवा आपल्या अधिकाऱ्याच्या आज्ञेने केला आहे. जर अशी एखादी घटना घडली, तर अपराधी व त्याला आज्ञा देणारा असे दोघेही शिक्षेस पात्र ठरतील. आणि जर आज्ञापालन करण्यास नाकर देत आहे म्हणून एखाद्या शासकाने आपल्या हाताखालच्या सेवकाविरुद्ध कोणत्याही प्रकारची अशिष्ट कार्यवाही केली तर तो न्यायालयाकडून न्याय मिळवून आपल्या अधिकारांचे रक्षणसुद्धा करू शकतो. आणि अशी चुकीची कृत्ये करणाऱ्या शासकाला शिक्षा भोगावयास लावू शकतो.

## १५. राज्य कारभारात भाग घेण्याचा अधिकार

इस्लामनुसार जगात मानवी राज्य मुळात अल्लाहचे प्रतिनिधित्व आहे. हे प्रतिनिधित्व एखाद्या माणसाला अथवा घराण्याला किंवा जमात किंवा वर्गाला नव्हे, तर संपूर्ण इस्लाम धर्मियांना दिले जाते. पवित्र कुरआनमध्ये आले आहे,

"अल्लाहने वचन दिले आहे तुमच्यापैकी त्या लोकांना जे श्रद्धा ठेवतील आणि सत्कृत्ये करतील. तो त्यांना पृथ्वीतलावर त्याचप्रमाणे खलीफा (आपला नायब) बनवील."
(दिव्य कुरआन, २४:५५)

यावरून स्पष्ट होते की प्रतिनिधित्व सामूहिक आहे ज्यात प्रत्येक मुस्लिम गुलामाची भागीदारी कोणत्याही दुसऱ्या मुस्लिमांपेक्षा कमीही नाही व अधिकसुद्धा नाही. या सामूहिक प्रतिनिधित्वाची व्यवस्था चालविण्यासाठी व्यावहारिक पद्धत कोणती असावी हे पवित्र कुरआनमध्ये स्पष्ट केले आहे, ती अशी,

"मुस्लिमांची कामे आपापसात सल्ला मसलतीने चालतात."
(दिव्य कुरआन, ४२:३८)

या नियमानुसार प्रत्येक मुस्लिमांचा हा अधिकार आहे की राज्याचे काम चालविण्यासाठी त्याचा सल्ला प्रत्यक्ष रूपाने घेतला जावा किंवा अप्रत्यक्ष रूपाने. त्याचा सल्ला त्याने निवडलेल्या प्रतिनिधीमार्फत घेतला जावा. इस्लाम या गोष्टीला मुळीच

धर्मानुकूल मानीत नाही की एखाद्या माणसाने किंवा लोकांच्या एखाद्या समूहाने आम मुस्लिमांना धाब्यावर बसवून स्वत: सत्ता सांभाळावी आणि इस्लाम ही गोष्टसुद्धा बरोबर समजत नाही की, एखाद्या शासकाने शूरा (सल्लामसलती) चा केवळ देखावा करून लाचलुचपत, फसवणूक, जबरदस्ती आणि अनियमिततेचा आधार घेऊन स्वत:ला निवडून घ्यावे आणि सल्लागार समितीत आपल्या मर्जीतील लोकांची वर्णी लावावी. हा केवळ मानवजातीशीच नव्हे तर त्या अल्लाहशी सुद्धा द्रोह आहे ज्याने मुस्लिमांना प्रतिनिधित्वाचे अधिकार दिलेले आहेत आणि त्या अधिकारांचा प्रयोग करण्यासाठी सल्लागार समितीची पद्धत ठरवून दिलेली आहे. याशिवाय अन्य कोणत्याही शूराचा अर्थ नाही,

(१) शासक आणि त्याला सल्ला देणारे प्रतिनिधी लोकांच्या स्वतंत्र मर्जीने निवडले गेले असावेत.

(२) लोकांना आणि त्यांच्या प्रतिनिधींना टीका, विरोध आणि आपली मते प्रकट करण्याचे स्वातंत्र्य असावे.

(३) सामान्य लोकांसमोर देशाच्या परिस्थितीचे चित्र पूर्णपणे खरेखरे यावे जेणेकरून त्यांना हे मत तयार करता यावे की शासन बरोबर कार्य करीत आहे किंवा नाही.

(४) या गोष्टीची पूर्ण शाश्वती असावी की शासनाने तेच करावे जे लोकांना पसंत आहे आणि त्या माणसाला पदावरून हटविले जावे ज्याला लोक पसंत करीत नाहीत.

## सारांश

बंधुनो! असा आहे एक संक्षिप्त आराखडा त्या अधिकारांचा जो आजपासून चौदाशे वर्षांपूर्वी इस्लामने मानवाला, युद्ध करणाऱ्या लोकांना, आपल्या राज्याच्या नागरिकांना दिला होता आणि त्याचा दर्जा प्रत्येक मुस्लिमांच्या दृष्टीने कायमस्वरूपी कायद्याचा आहे. एकीकडे हे जाणून ईमान (धर्मावरील विश्वास) वृद्धिंगत होतो की प्रगति व प्रगल्भ विचारसरणीचा दावा करणारे जग आजतागायत याच्यापेक्षा अधिक न्यायसंगत कायदा बनविण्यात असमर्थ ठरले आहे. तर दुसरीकडे हे पाहून मनावर आघात पोचतो की आम्हीच ते दुर्दैवी लोक आहोत ज्यांच्याजवळ इतका उच्च कोटीचा व दृढ कायदा आहे.तरीसुद्धा आम्ही मार्गदर्शनासाठी त्या पुढाऱ्यांकडे जातो ज्यांच्या विचारांतसुद्धा अधिकार व न्यायाची ही उंची कधीदेखील आलेली नाही. यापेक्षा अधिक दु:ख हे पाहून होते की इस्लामला मानण्याची मिजास मारणाऱ्या शासकांनी आज जगभरात अल्लाह व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अवज्ञेवर आपल्या राज्याचा पाया घातलेला आहे.

*** समाप्त ***